अनार्य व आर्य दैवतांचे सहअस्तित्व या दोन लोकांच्या प्रारंभिक सहअस्तित्वाचे प्रतिबिंबमात्र होते. कोसंबी या सहअस्तित्वाचा खुलासा पुनर्समन्वय ( recombination ) असा करतात.

वर उद्‌धृत केलेले तैत्तिरीय संहितेतले निर्ऋतिस्तवन तिचा चोर व लुटारूंच्या रस्त्याने जाणारी म्हणून निषेध करते. यावरून हे सहअस्तित्व वैमनस्यभावी होते असे दिसते. गणप्रथाक लोक संघात (confederation) एकत्र येवो वा लढायात परस्परविरोधी होवो, ते आपली 'राष्ट्रीय' दैवते अबाधित ठेवून त्यावरच श्रद्धा ठेवतात असे दिसून येते. रॉबर्टसन स्मिथ या वस्तुस्थितीचे सर्वोत्कृष्ट विश्लेषण करतो–

'स्थूल दृष्टचा बोलायचे तर कोणतेही दैवत त्याच्या भक्तांच्या भूमीचे अधिदैवत असते. कीनान ही जशी जेहूवाची भूमी आहे तसेच इस्रएल हे जेहूवाचे लोक आहेत. त्याचप्रमाणे असीरियाच्या ( अश्शुर ) भूमीला ते नाव अश्शुर देवावरून पडले आहे, आणि सर्वसाधारणत: ख्रिश्चनेतरांची दैवते राष्ट्रांची व भूमींची अधिदैवते असतात. वास्तवात दैवताचे त्याच्या भूमीशी संबंध केवळ राजकीयच नसत वा त्या देशवासीयांशी असलेल्या त्याच्या नात्यावरच अवलंबून असत. असीरियाच्या राजाने ज्या अरामियन व बाबिलोनियन लोकांना उत्तर इस्रएलमध्ये वसवले त्यांनी आपापली दैवतेही बरोबर आणली होती; पण जेव्हा त्यांच्यावर सिंहांनी हल्ला केला तेव्हा 'तद्देशीय दैवतांचाच' धावा केला पाहिजे असे त्यांना वाटले. यावरून त्याच दैवतांचे त्यांच्या देशातल्या जनावरांवर तसेच माणसांवर प्रभुत्व असू शकत होते असे आपण अनुमान काढू शकतो. त्याचप्रमाणे दमास्कसच्या अरामियनांचा समारियाच्या डोंगराळ प्रदेशात पराभव झाल्यानंतर त्यांनी असा युक्तिवाद केला की इस्रएलची दैवते डोंगरांची अधिदैवते असल्याने त्यांचा समतल भूमीवर प्रभाव पडू शकणार नाही; दैवतांच्या शक्तीला भौतिक व स्थानिक मर्यादा असतात. दैवताची पूजा त्याच्या भूमीबाहेर होऊ शकत नाही. जेहूवाच्याही पूजेला लावल्या गेलेल्या या धारणेचा अर्थ केवळ असाच होतो असे नाही की जेथे त्या दैवताचे देऊळ नाही तेथे त्याची पूजा होत नाही, तर परकीय दैवताची भूमी आपले देऊळ बांधण्यास अयोग्य असते असाही होतो. बायबलच्या जुन्या कराराच्या भाषेत परकीय देश अपवित्र असतात. म्हणून दमास्कसमध्ये नामनला जेव्हा इस्रएलच्या देवाची पूजा करायची असते तेव्हा त्याला आपल्या अरामियन निवासस्थानात जेहूवाचे मंदिर उभारण्याकरता दोन गाढवांच्या ओझ्यांइतकी कीनानची माती मागून आणावी लागते.'[११]

म्हणून, जरी पशुपालक आर्यांनी निर्ऋतीच्या भूमीत स्थायिक होऊन त्यांनी तिचा व तिच्या लोकांच्या विधींचा स्वीकार केला, तरीही त्यांचा निर्ऋति व तिच्या लोकांबद्दलचा अविश्वास कायम राहिला व त्याचा आविष्कार त्यांनी तिला आपल्या देवतेची, अदितीची, वशिनी करण्यात झाला. राजसूय हा उघडपणे आर्यपूर्व असलेला व आर्यांनी स्वीकारलेला विधी निर्ऋतीला हवि अर्पण करण्यापासून सुरू होतो;[१२] पण या यज्ञातली तिची मानवी प्रतिनिधी राजाची 'टाकलेली बायको,' परिवृक्ति, आहे, तर पट्टराणीचे, महिषीचे, अधिदैवत आहे अदिति.[१३]

आर्यपूर्व वा अनार्य लोकांबद्दल जास्त माहिती मिळवण्यासाठी आपल्याला त्यांची देवता निर्ऋति इची जास्त माहिती मिळवली पाहिजे. कारण कुण्डपूव जातक म्हणते —

यथञ्ञो पुरिसा होति, तथञ्ञा तस्स देवता ।[१४]
[ जसा माणूस, तसे त्याचे दैवत. ] *

तैत्तिरीय (४.२.५) व वाजसनेयि (१२.६२–६६) संहितांच्या निर्ऋतिस्तवनानंतर जमीन नांगरण्याचा व सामूहिक शेतीची देवता सीता इच्या स्तवनाचा विधी येतो. कर्मकांडी विनियोग (विधीचा आदेश) सांगतो की उदुंबराच्या (उंबराच्या) लाकडाने बनवलेल्या नांगराने चार किरा नांगराव्या.[१५] नांगरणीच्या विधीनंतर ऋग्वेदीय सूक्त १०.९७ या वनस्पती-(– ओषधि –) स्तवनाचा विधी येतो.[१६] कर्मकांडी नंतर विनियोग देतात की या सूक्ताच्या पहिल्या १५ ऋचा म्हणत या चार किरांमध्ये सर्व वनस्पती पेराव्या.[१७] या सूक्ताची पहिली ऋचा पुढीलप्रमाणे आहे —

या ओषधिः पूर्वा जाता देवेभ्यस् त्रि–युगं पुरा ।
मनै नु बभ्रूणाम् अहं शतं धामानि सप्त च ॥

कीथ असा अनुवाद करतो —

'या वनस्पतींचा जन्म
देवांच्या पूर्वी तीन पिढ्या झाला,
या पिंगला (वनस्पतींच्या) मी
एकशेसात धामांचे स्तवन करतो.'[१८]

---

* एक संस्कृत म्हण तेच सांगते, पण उलट्या क्रमाने यादृशो यक्षो, बलिर् अप्य् अस्य तादृशः । [ जसा यक्ष, तसाच त्याला द्यायचा बळी. ]

अनुक्रमणिका

महामहोपाध्याय सिद्धेश्वरशास्त्री चित्राव आपल्या ऋग्वेदाच्या मराठी भाषांतरात या ऋचेचा अनुवाद करताना 'त्रि-युगम्' ऐवजी 'त्रि-युतम्' असा पाठभेद करतात व त्याचा अर्थ निर्ऋति असा देतात.[१९] या पाठभेदातून या ऋचेचा अनुवाद असा होईल—

निर्ऋति व देव यांच्यापासून जन्मलेल्या आणि एकशेसात (कुल-) घरे असलेल्या आद्य पिंगला वनस्पती (-मात्रांचे) मी स्तवन करतो.

एक मानवाकारी देवता वनस्पतिविश्वाला जन्म देते हे कसे? आदि-मानव हा जरी शारीरिक दृष्टचा हजारो-लाखो वर्षांपासून मानवेतर जगापासून पृथक् झालेला होता, तरी मानसिक दृष्टचा त्याला या जगाशी बांधणारी नाळ तो तोडू शकलेला नव्हता. म्हणून हे सर्व सजीव व निर्जीव जग आपल्याप्रमाणेच मानवी आहे असे त्याला वाटे. भारतीय पुराणे मानवप्राण्यांनी जनावरे व वनस्पतींनाच काय पण निर्जीव वस्तूंनाही जन्म देणाऱ्या गोष्टींनी भरलेली आहेत. कद्रू ही सर्पांची आई होती, तर सुपर्णी वा विनता पक्षी वा गरुडांची.[२०] ऋषींनी यादवांना शाप दिला होता की कृष्णाचा मुलगा सांब अशा लोखंडी मुसळाला जन्म देईल की जे त्यांच्या सर्वनाशाला कारणीभूत होईल (१६.१.१९) अशी अनेक उदाहरणे देता येतील.

या मानसिक घडणीमुळेच गणमानवाचा विश्वास होता की सर्व सजीव व निर्जीव जग एका मानवाकारी जगन्मातेपासून जन्मले आहे चट्टोपाध्याय आपले लक्ष मार्कंडेय पुराणातल्या एका वैशिष्टचपूर्ण उताऱ्याकडे वेधतात—

'मार्कंडेय पुराणात देवी-माहात्म्य, म्हणजे देवीची थोरवी, नावाचे एक पर्व आहे. त्यात स्वतः देवी एक धक्का देणारी घोषणा करते :

'नंतर, देवांनो, मी सबंध जगाचे जीवनदायी वनस्पतींनी पोषण करीन, ज्या मुसळधार पावसाळ्यात माझ्या देहातून उगवतील (आत्म-देह-समुद्भवैः।) मग मी शाकम्भरी म्हणून या पृथ्वीतलावर प्रसिद्धी पावेन.'[२१]

ते पुढे जाऊन खुलासा करतात की मातृदेवतेच्या या कल्पनेतूनच सिंधु-संस्कृतीच्या जनतेने मातृदेवतेचे रूपांकन करणारी मुद्रा घडवली—

'पुराणवस्तुसंशोधकांनी या विश्वासाचा ठोस पुरावा हराप्पाला उकरून काढला आहे (आकृती २). मार्शल वर्णन करतो.

'......हराप्पाची एक अत्यंत वैशिष्टचपूर्ण दीर्घचौकोनाकार मुद्रा (सचित्र पान २२.१२), ज्यावर पाय फाकाटलेली व योनीतून वनस्पती उगवलेली नग्न स्त्रीची आकृती काढलेली आहे.''[२१]

अनुक्रमणिका

वासुदेव शरण अग्रवालनी आपल्या 'इंडिया अॅज नोन टु पाणिनि' या ग्रंथात भूमातेच्या प्राचीन उत्थितमृत्तिकाशिल्पाचे ( relief ) छायाचित्र दिले आहे. तिचे हात सर्पांनी वेढलेले आहेत व तिच्या डोक्यावर वनस्पती उगवलेल्या आहेत. ती तैत्तिरीय संहितेची,[२३] ऐतरेय ब्राह्मणाची[२४] व शतपथ ब्राह्मणाची[२५] सर्पराज्ञी आहे.

म्हणून असे संयुक्तिकपणे म्हटले जाऊ शकते की ही आकृती एकशेसात घरे असलेल्या वनस्पतिविश्वाला जन्म देणाऱ्या निर्ऋति या आर्यपूर्व जगन्मातेवाचून दुसऱ्या कोणाचीही असू शकत नाही. निर्ऋतीच्या नग्नतेचा पुरावा ५.७.८. ही अथर्ववेदीय ऋचा देते.

आता ही वनस्पतींची घरे म्हणजे काय आहेत? शक्ति वा मातृदेवतेचे भक्त असलेल्या शाक्तांना त्यांचे धर्मग्रंथ कुलवृक्ष व कुलयोगिनींची पूजा करायचा आदेश देतात–

'या संबंधात शाक्तवादाची दुसरी बाजू आपले लक्ष वेधते आणि ती म्हणजे कुलवृक्षांची पूजा. अंथरुणातून उठल्याबरोबर शाक्ताने पार पाडायचा अगदी पहिला विधी म्हणजे कुलवृक्षांना 'ॐ कुलवृक्षेभ्यो नमः' या मंत्राने वंदन करणे. कुलचूडामणि सांगतो, 'जेथे कोठे कुलवृक्ष दिसेल तेथे त्याला वंदन केले पाहिजे.' शाक्तानंद तरंगिणीचा लेखक कुलवृक्षांच्या दोन याद्या उद्धृत करतो. ... कुलवृक्षांबद्दल असे म्हटले आहे, 'सर्व कुलवृक्षांमध्ये कुलयोगिनींचे निरंतर वास्तव्य असते. कोणीही कुलवृक्षांखाली झोपू नये वा त्यांना इजा करू नये.'[२६]

कुलवृक्षाचा अर्थ होतो कुलदैवत. उत्तररामचरित नाटकाच्या सातव्या अंकात पृथ्वी नदीदेवता गंगेकडे बोट दाखवून आपली कन्या सीतेला सांगते– "ही आहे तुझ्या सासरची कुलदेवता भागीरथी (इयं ते श्वशुर-कुलदेवता भागीरथी।)." बौद्ध जातक कथा नमूद करतात की त्या काळात राजापासून सामान्य प्रजेपर्यंत सर्व लोकांचे आपापले कुलदैवत म्हणून विशिष्ट वृक्ष असत ज्यांना 'मङ्गल-रुक्ख' असे म्हटले जाई. कुसनाळि जातकात वाराणसीच्या ब्रह्मदत्त राजाचा स्वतःचा मंगलवृक्ष होता.[२७] कुसनाळि व पलास जातकांमध्ये वाराणसी राज्यातले ग्रामीण व शहरी लोक आपापल्या मंगलवृक्षांना बळी देताना दिसतात.[२८] जातकांमधल्या गाथा गद्यापेक्षा फार पुरातन, कमीतकमी बुद्धपूर्व, आहेत. कुण्डपूव जातकाच्या गाथेत वाट्याकरता बळीऐवजी भाग हा शब्द आहे. भाग हा गणाच्या वा ज्ञातीच्या वा कुलाच्या सभासदाला वा दैवताला दिला जातो, गणेतराला ( अन्य-उदर्य ) नाही. म्हणून हे वृक्ष कुलदैवते व कुलयोगिनी वा कुलमाताच असले पाहिजेत.

अशा प्रकारे एकशेसात घरे ( धामानि ) म्हणजे कुलमातांच्या अधिपत्याखालील एकशेसात कुळेच होती. वाजसनेयि संहितेचा विनियोग सांगतो की औषधि–सूक्ताच्या पहिल्या पंधरा ऋचा ( १२.७५–९० ) पाच तृचांमध्ये ( तृचा म्हणजे तीन ऋचांचा समूह ) म्हणत चार किरांमध्ये वनस्पती पेराव्या.[२९] येथे आपल्याला पाच ज्ञातींच्या व्यवस्थेचे चार ज्ञातींच्या व्यवस्थेत रूपांतर केलेले प्रत्यक्षपणे दिसते.

वाजसनेयी संहितेने अनार्य परंपरा सुरक्षित ठेवावी यात आश्चर्यकारक असे काहीच नाही. धर्मशास्त्रीय वाङ्मयाने सुरक्षित ठेवलेली एक परंपरा म्हणते की शूद्र हे वाजसनेयिन् आहेत–

'... काही सारसंग्रहात शूद्र हे वाजसनेयिन् होते असे स्मृतीचे उद्धरण आपणाला आढळते. याचा अर्थ असा दिला आहे की शूद्राने वाजसनेयी शाखेच्या गृह्यसूत्राने सांगितलेले संस्कार पाळावेत व एखाद्या ब्राह्मणाने त्याच्याकरता मंत्राचा पाठ करावा... '[३०]

ओषधि– सूक्ताच्या १०.९७.१७ व १८ या ऋचा सोमाचा वनस्पतींचा राजा ( या ओषधयः सोम–राज्ञीः । ) म्हणून, व परत्वे निर्ऋतीचा दैवी पती म्हणून, कटाक्षपूर्वक उल्लेख करतात. अमावास्या म्हणजे चंद्र व पृथ्वीचा देवविवाह, या शतपथ ब्राह्मणाच्या व्युत्पत्तिशास्त्रीय व्याख्येतून वरील विधानाला पुष्टीच मिळते–

'... आता हा सोम राजा, देवांचे अन्न, दुसरा तिसरा कोणीही नसून चंद्रच आहे. जेव्हा तो ( चंद्रमस्, पुल्लिंगी ) त्या रात्री ना पूर्वेला दिसतो ना पश्चिमेला, तेव्हा तो या लोकाला भेट देतो; म्हणून तो पाण्यात ( अप्, स्त्रीलिंगी ) व वनस्पतीत ( ओषधि, स्त्रीलिंगी ) प्रविष्ट होतो ... आणि रात्री तो सहवास ( अमा वस् ) करतो, म्हणून त्या रात्रीला अमावास्या ( सहवास वा गृहवास ) म्हणतात. '[३१]

अगोदर सांगितल्याप्रमाणे जैनांच्या कल्पसूत्रानुसार अमावास्या ही स्वतः निर्ऋतीच होती. अशाप्रकारे दर अमावास्येला चंद्रदेव सोम व पृथ्वीदेवी निर्ऋति यांचा देवविवाह संपन्न होई. वराने वधूच्या घरी वास्तव्य करणे हेच दाखवते की हा मातृसत्ताक ( matrilochal ) विवाह होता. या मासिक विवाहात, ज्याला ऐतरेय ब्राह्मण (४·२७) देवविवाह म्हणतो, जुन्या चंद्राचा अंत होई व नव्या चंद्राचा जन्म होई. म्हणूनच शतपथ ब्राह्मण म्हणतो– 'मृत्यूतच अमर्त्यता आहे ( अन्तरं मृत्योर् अमृतम् । ).'[३२]

देवी निर्ऋति

१ | २ | ३

जनी त्रि-अम्बा

११ रुद्र

१ मृगव्याध, २ सर्प, ३ निर्ऋति, ४ अज-एकपाद्, ५ अहिर्बुध्न्य, ६ पिनाकिन्, ७ परन्तप, ८ दहन, ९ ईश्वर, १० कपालिन्, ११ महाद्युति.[३३]

जनी गंगा

८ वसु

१ धर, २ ध्रुव, ३ सोम ४ अह, ५ अनिल, ६ अनल, ७ प्रत्यूष, ८ प्रभास.[३४]

जनी अदिति

१२ आदित्य

१ धातृ, २ मित्र, ३ अर्यमन्, ४ रुद्र, ५, वरुण ६ सूर्य ७ भग, ८ विवस्वत् ९ पूषन्, १० सवितृ, ११ त्वष्ट्र, १२ विष्णु.[३५]

[ १ बल, २ धृति, ३ विपाप्मन्, ४ पुण्यकृत, ५ पावन, ६ पार्ष्णिक्षेमन्, १२ कीर्तिमान्, १३ कृत, १४ जितात्मन्, १५ मुनिवीर्य, १६ दीप्तरोम २२ शैलाभ, २३ परमक्रोधिन् २४ धीरोष्णिन्, २५ भूपती, २६ स्रज, ३२ सूर्यश्री, ३३ सोमप, ३४ सूर्यसावित्र, ३५ दत्तात्मन्, ३६ पुण्डरीयक, ४२ सुरेश, ४३ व्योमारि, ४४ शंकर, ४५ भव, ४६ ईश, ४७ कर्तृ ५३ पञ्चवीर्य, ५४ आदित्य, ५५, रश्मिवत्, ५६ सहाकृत्, ५७ ६२ नप्तृ, ६३ ईश्वर.[३७] ]

सोम

४

५

जनी विश्वा

१३ विश्वेदेव

१ वसु, २ सत्य, ३ क्रतु, ४ दक्ष, ५ काल ६ काम, ७ धृति, ८ कुरु, ९ पुरूरवस्, १० माद्रव, ११ ? १२ ? १३ ?[२६]

जनी रोदसी

६३ मरुत्

७ समूह, ८ दिव्यसानु, ९ बिवस्वत्, १० वीर्यवत्, ११ ह्रीमत्,
न्, १७ भयंकर, १८ अनुकर्मन्, १९ प्रतीत, २० प्रदातृ, २१ अंशुमत्,
२७ वज्रिन्, २८ वरिन्, २९ विश्वेदेव, ३० विद्युद्वर्चस्, ३१ सोमवर्चस्,
३७ उष्णीनाभ, ३८ नभोद, ३९ विश्वायु, ४० दीप्ति, ४१ चमूहर,
४८ कृति, ४९ दक्ष, ५० भुवन, ५१ दिव्यकर्मकृत्, ५२ गणित,
सोमवर्चस्, ५८ विश्वकृत्, ५९ कवि, ६० अनुगोप्तृ, ६१ सुगोप्तृ,

पाच ज्ञातीत संघटित झालेल्या १०७ कुलांचा बनलेला हा अनार्य गण, ज्याचे शासन पृथ्वीदेवी निर्ऋति व चंद्रदेव सोम यांचे मानवी प्रतिनिधी करीत, तो आकृतीत असा दिसेल–

महाभारत चुकीने ६३ विश्वेदेवांची यादी देते. पण अगोदर दाखवल्या-प्रमाणे विश्वेदेव १३ होते तर मरुत् ६३.

तैत्तिरीय संहितेचा उपरिर्निदिष्ट मंत्र म्हणतो की निर्ऋति 'चौरस्त्यावर उभी राहाते (तस्थौ समरे पथीनाम् ।). यावरून असे दिसते की, चौरस्ता हे निर्ऋतीचे पवित्र स्थान होते. स्मृतिकार आपस्तंब (ख्रिस्तपूर्व ६०० ते ३००), गौतम (ख्रिस्तपूर्व ६०० ते ४००), बौधायन (ख्रिस्तपूर्व ५०० ते २००) व वसिष्ठ (ख्रिस्तपूर्व ३०० ते २००) आदेश देतात की निर्ऋतीला बळी चौरस्त्यावर द्यावा. [१८]

पूर्वाचार काळापासून मातृदेवतांना बळी चौरस्त्यावरच दिला जात असे. मृच्छकटिक नाटकाचा (अंक १) नायक चारुदत्त जेव्हा आपला मित्र मैत्रेय याला चौरस्त्यावर जाऊन त्याच्या तर्फे त्या दिवसाचा बळी मातृदेवतांना द्यायला सांगतो ("गच्छ त्वम् अपि चतुष्पथे मातृभ्यो बलिम् उपहर ।), तेव्हा तो एक कालमान्य प्रथामात्र पाळीत असतो. [१९]

बाणभट्ट त्याच्या कादंबरीत सांगतो की राणी विलासवती आपले वांझ-पण घालवण्याकरता प्रत्येक कृष्ण पक्षाच्या चतुर्दशीच्या रात्री एका मोठ्या भगताने काढलेल्या मंतरलेल्या वर्तुळात बसून विधिपूर्वक स्नान करी (महा-नरेन्द्र–लिखित–मण्डल–मध्यवर्तिनी विविध–बलिदान–आनंदितदिग्देवतांबहुल–चतुर्दशी–निशासु चतुष्पथे स्नान–मङ्गलानि भेजे ।). ही प्रथा लुप्तप्राय झालेली दिसत असली तरीही ग्रामीण भागात ती अजून तगून आहे गर्भदा § पाण्याने सर्वांगाला स्पर्श करावा म्हणून निपुत्रिक बाया पूर्णपणे नग्न होतात.

निर्ऋतीसारखी ग्रीक देवता हेकेट ही आहे – 'चंद्राशी सर्वात निकटवर्ती असलेले दैवत म्हणजे जादूटोण्याची देवता हेकेट. महिन्याच्या शेवटी, जेव्हा आकाशात चंद्र नसतो, तेव्हा ग्रीक गृहिणी झाडलोट करून केर चौरस्त्यावर नेत, नजर एकीकडे करून तो तेथे टाकीत व मागे न पाहता परतत. असे उकिरडे 'हेकेटची रात्र-भोजने' असे म्हटले जात. कल्पना अशी होती की इतर केरकचऱ्याबरोबर गोळा केलेले मानवी मलमूत्र करणीकवटाळाने भरलेले असते व म्हणून धोकेदायक असते......

§ Fertilising. खेड्यातला वाक्प्रचार– 'पोट पिकणे,' असा आहे.

'दर पौर्णिमेच्या दुसऱ्या दिवशी स्त्रिया चौरस्त्यावर जात व हेकेटला मेणबत्त्या खोचलेल्या रोटां-( पुरोडाशां )चा नैवेद्य दाखवीत, ज्यांना त्या 'तेजःपुंज' (amphiphontes) म्हणत. उद्देश हा की चंद्राचा प्रकाश कायम टिकावा. हे 'तेजःपुंज' आर्टेमीज ( या देवतेलाही ) अर्पण केले जात ... ... एस्किलस् सांगतो की हेकेट व आर्टेमीज् या दोन्ही प्रसूतीच्या देवता असून त्या एकच होत्या. दोन्ही देवतांना ट्रिओडिटीज् असेही म्हणतात, ज्याचा अर्थ होतो असे स्थान जेथे 'तीन रस्ते येऊन मिळतात' ... ...'[४०]

अ–ब्राह्मणी परंपरेत चौरस्ते एवढी पवित्र स्थाने होती की बुद्धासारख्या माणसाने चौरस्त्यावर त्याच्या अस्थींवर स्तूप उभारायचा आनंदला आदेश दिला–

'... मोठ्या चौरस्त्यावर तथागताच्या ( अस्थीवर ) स्तूप उभारावा आणि जे कोणी तेथे माळा वा गंध वा धूपलेप चढवतील, वा नमस्कार करतील, वा मन प्रसन्न करतील, ते त्यांच्या दीर्घकाळपर्यंत हिताचे व सुखाचे होईल.

'७९. "चार जण, आनंद, स्तूपाला पात्र आहेत कोणते चार? तथागत सम्यक् संबुद्ध स्तूपाला पात्र आहेत, प्रत्येक संबुद्ध स्तूपाला पात्र आहेत, तथागतांचा श्रावक ( शिष्य ) स्तूपाला पात्र आहे. व चक्रवर्ती राजा स्तूपाला पात्र आहे."[४१]

बुद्ध येथे आर्यपूर्व काळापासून चौरस्त्यांवर पुरोहित व राजर्षींच्या ( चक्कवत्ती ) अस्थींवर स्तूप उभारायच्या प्राचीन परंपरेचा पुनरुच्चार मात्र आहे.

निर्ऋतीला पवित्र असलेले स्थान, चौरस्ता, गर्भदा स्थान होते हे नुकतेच सांगितले गेले आहे. निर्ऋतीची खुद्द व्युत्पत्तीच दाखवते की ती सुपीकतेची देवता होती– '... निर्ऋति म्हणण्याचे कारण म्हणजे ती (पृथ्वी) उपभोग देते ( निर्ऋतिर् निर्रमणात् । ) ...'[४२] उपभोग देणे याचा अर्थ काय होतो?

योजलेले क्रियापद आहे 'रम्'. त्याचा अर्थ 'संभोग' असाही होतो. रामायण (१.७७.१३) सांगते की सीता व तिच्या बहिणींनी लग्न झाल्यानंतर लगेच आपापल्या पतींसह संभोगसुखाचा आनंद अनुभवला ( रेमिरे मुदिताः सर्वाः भर्तृभिर् मुदिता रहः ।। ). हा अर्थ दुसऱ्या एका मातृदेवतेच्या, उर्वशीच्या, निरुक्तीय ( ५. १३ ) व्युत्पत्तीवरून निर्विवादपणे स्पष्ट होतो– 'उर्वशी हे एका अप्सरेचे ( नाव आहे ), ( कारण ) ती विस्तृत प्रदेश व्यापते

( उरु + अश् ), वा ती मांड्यांनी व्यापते ...' दुर्गा दुसऱ्या अर्थाचे स्पष्टीकरण करतो– 'संभोगसुखात.'[४३]

निर्ऋतीची जनता आर्यांकडून दास बनवली गेल्यानंतर तिच्या मुलींना त्यांचे स्वामी 'रामा' म्हणू लागले. हा शब्दही 'रम्' धातूपासूनच बनलेला आहे–

'... ( यज्ञ ) अग्नी प्रदीप्त केल्यानंतर रामाकडे जाऊ नये. कृष्णवर्णा (सुंदरी) केवळ संभोगाकरताच (रमणाय) असते, धर्मकृत्यांकरता नाही ...'[४४]

स्त्रीला दास्यात ढकलल्यानंतरच स्त्रीपुरुषसंबंधाचे नैतिक दंडक बनले. कुलपती कर्ण या आधारावरच द्रौपदीची बंधकी, अधम दासी वा वेश्या, म्हणून निर्भर्त्सना करतो ( २. ६८. ३५ ) –

" एको भर्ता स्त्रिया देवैर् विहितः कुरुनन्दन ।
इयं त्व् अनेक-वशगा बन्धकी इति विनिश्चिता ॥ "

[ " कुरुनंदना ( विकर्णा ) ! देवांचा दंडक आहे की स्त्रीला एकच पती असावा. पण ही ( द्रौपदी ) अनेकांच्या मालकीची असल्यामुळे बंधकीच म्हटली पाहिजे यात वाद नाही. " ]

पण खुद्द महाभारतच सांगते की स्त्री जेव्हा स्वतंत्र होती त्यावेळी स्त्री-पुरुषसंबंधाचे पूर्ण वेगळे 'कायदेकानू' जारी होते. श्वेतकेतूच्या मातेचे उदाहरण[४५] अगोदर उद्धृत केलेलेच आहे. कुंतीचे नियोगासाठी मन वळवताना पंडु त्याच प्राचीन नीतिशास्त्राचा उपदेश करतो –

'पण मी तुला आता नीतिशास्त्रात पारंगत अशा विख्यात ऋषींनी उपदेशिलेला पुरातन आचार सांगणार आहे ..... स्त्रिया पूर्वी घरात कोंडलेल्या नसत आणि पती व इतर नातेवाईकांच्या आधीन नसत. त्या अनिबंधपणे फिरून मनमुराद आनंद उपभोगू शकत. सुंदरी, तेव्हा त्या आपल्या पतीशी एकनिष्ठ नसत, तरीही त्यांना दुराचारी समजले जात नसे; कारण तोच त्या युगाचा आचार होता. तो आचार अजूनही यत्किंचित् मत्सरावाचून पशुपक्षांमध्ये रूढ आहे. अनेक दाखल्यांनी सिद्ध अशा या आचाराची मोठमोठ्या ऋषींनी प्रशंसा केलेली आहे. निमुळत्या मांड्या असलेल्या ( प्रिये ), उत्तर कुरूंमध्ये या आचाराकडे अजूनही गौरवाने पाहिले जाते. स्त्रियांना एवढे स्वातंत्र्य देणारा हा आचार प्राचीन काळापासून मान्यता पावलेला आहे. वर्तमान आचार अगदी अलिकडेच रूढ झालेला आहे'[४६]

उन्मुक्त कामाचार म्हणजे कामवासनेचा निर्हेतुक पाठपुरावा नव्हता, तर तो मायाशक्तीचा निदर्शक मानला जात होता. जगभरच्या कृषक गणप्रधान

लोकांचा असा विश्वास होता की स्त्रियांच्या अनियंत्रित कामाचारातच जमिनीच्या सुपीकतेची हमी आहे. म्हणून भरघोस पीक येण्यासाठी गणाचे सर्व स्त्रीपुरुष ठराविक दिवशी स्वैर संभोग करीत ब्रिफॉल्ट प्रत्येक खंडातील आदिवासींचे दाखले देतो, ज्यांतून भारतीय आदिवासींची उदाहरणे खाली दिली आहेत—

' .. छोटा नागपूर मधील होंमध्ये हंगाम म्हणजे स्वैराचाराचा परवाना असतो, व असा स्वैराचार आत्यंतिक आवश्यकतेची बाब समजली जाते. ओरिसातील भुइयांमध्ये माघ पोरइ नावाने ओळखल्या जाणाऱ्या वसंतोत्सवात " रक्ताच्या नातेवाईकांचा व नवऱ्याचा धाक गुंडाळून ठेवला जातो. " राजमहाल जिल्ह्यातल्या पर्गनैत नावाच्या कुणबी जातीत सोहरइ नावाचा जो वार्षिक महोत्सव होतो त्यातही अविवाहित स्त्रीपुरुष स्वैरसंभोग करतात. जयपुरी रुंजांच्या नववर्षोत्सवात स्वैरसंभोग करायचे व जोडीदार बदलायचे सत्र महिनाभर चालते. निलगिरी टेकड्यातील कोतांचा अविरत स्वैराचाराचा असाच एक उत्सव आहे. आसामचे सर्व आदिवासी गण साजरा करीत असलेल्या वसंतोत्सवात स्त्रियांना पूर्ण मोकळीक दिली जाऊनही "त्यांना ना बट्टा लागतो, ना प्रवाद येतो, ना बदनामी होते. " अशाच प्रकारचे उत्सव खोंडिस्तानात, मणिपुरच्या व उत्तर ब्रह्मदेशाच्या रानटी गणांमध्ये साजरे होतात.' ४७

प्राचीन इजिप्त व आशियाच्या महान् कृषिसंस्कृतींमध्ये प्रत्येक स्त्रीने, मग ती उच्च असो वा नीच आयुष्यातून एकदा तरी मातृदेवतेच्या मंदिरद्वारावर बसून ' बाजारबसवीपण ' केले पाहिजे असा दंडक होता –

'.... ... बाबिलोनियात प्रत्येक स्त्रीला हे बंधनकारक होते की, जीवनातून एकदा तरी, बहुधा लग्नाआधी, तिने आपली सर्वोत्कृष्ट वस्त्रे परिधान करून महादेवीच्या मंदिरावर गेले पाहिजे व एखादा अपरिचित इसम येऊन तिच्या खोळीत एक नाणे टाकून " – आपली महादेवी तुझ्यावर प्रसन्न होवो अशी मी प्रार्थना करतो " – तोपर्यंत वाट पाहात बसले पाहिजे. नंतर ती त्या अपरिचित इसमाबरोबर लगतच्या एका घरात जाई व त्याच्या बाहुपाशात स्वत:ला सोपवी. ही प्रथा एका काळी सर्व सेमेटिक देशांमध्ये प्रचलित होती असे दिसते. या प्रथेचा कॉन्स्टंटाइनच्या काळात हायरोपोलिसला अंत करण्यात आला.

' फीनिजिअन मंदिरांमध्ये शरीरविक्रय करताना स्त्रियांची अशी श्रद्धा असे की यामुळे त्या दैवताची कृपा होते. एमोरींचा असा दंडक होता की जिचे

लग्न होऊ घातले असेल तिने ( मंदिर- ) द्वारावर स्वेच्छेने संभोगदानासाठी सात दिवस बसले पाहिजे." सायप्रसमध्ये प्रत्येक स्त्रीला–मग ती राजकन्या असो की कृषककन्या – देवीच्या द्वारावर विवाहपूर्व आत्मसमर्पण करावे लागे. लीडियात सर्व मुलींना लग्नापूर्वी वेश्याव्यवसाय करणे बंधनकारक होते. ॲनातोलियन किनाऱ्यावरील बेटांमध्ये या प्रथा अजून अवशिष्ट होत्या. मुलींनी वेश्याव्यवसाय करून आपला हुंडा कमवावा असा चिऑसमध्ये अठराव्या शतकापर्यंत प्रघात होता. आर्मेनियात खानदानी घराण्यातील मुलींनी लग्नापूर्वी दीर्घ काळपर्यंत मंदिरांमध्ये देवदासींचे काम करणे हे त्यांचे कर्तव्य समजले जाई. (इजिप्शियन) खानदानी कुटुंबातील प्रत्येक मुलीची लग्नाआधी व न्हाण येण्याआधी काही काळपर्यंत देवाच्या मंदिरात नेमणूक होई, आणि मंदिराच्या कोषात ठराविक रकम भरणाऱ्या कोणाही अपरिचित इसमाशी ती समागम करी. हा स्वैरसंभोग पहिले रजोदर्शन होताच संपे आणि मग त्या तरुण स्त्रीचे तिच्या दर्जाला साजेसे असे लग्न होई.'[४८]

इजिप्तने इस्लामचा अंगीकार केल्यानंतरही ही प्रथा चालू राहिली –

'... इजिप्तमध्ये, दाट लोकसंख्येच्या टान्टा शहरात भरणारा अहमद अल् बेदवीचा वार्षिक 'मुलीद' वा 'संताचा महाभोज' मुस्लिम जगातला एक सर्वात मोठा महोत्सव आहे. खालच्या इजिप्तमधून प्रचंड जनसमुदाय या उत्सवाला जमतात. अलिकडच्या काळापर्यंत इजिप्शियन सरकार 'घोवाझीं – करता' खास तंबू उभारीत असे. किमान सहाशे घोवाझी देवदासी म्हणून उत्सवकालात आपली दुकाने थाटीत. अजूनही असा रिवाज आहे की कुलीनतम कुटुंबांच्या ज्या स्त्रियांना काही 'मागणे' करायचे असेल तर त्या या पवित्र उत्सवाला जाऊन भेटणाऱ्या पहिल्याच माणसाला वश होण्याची 'मानता' * करतात...'[४९]

पण उद्दालक ऋषीची पत्नी व कुंती यांची उदाहरणे दाखवतात की लग्नानंतर सुद्धा स्त्रियांच्या स्वातंत्र्यावर खुद्द पतींकडूनही मर्यादा पडत नसत. कर्णाचे नीतिशास्त्र जर आपण प्रमाणभूत मानायचे ठरवले ( जो स्वत: कुंतीचा कानीन पुत्र होता ), तर प्राचीन काळच्या सर्व स्त्रिया बंधकी होत्या व सर्व पुरुष आपल्या बायकांचे नामधारी नवरे होते असे समजावे लागेल. प्राचीन

* 'चैत्य' चे विवरण पहा : 'मानता फेडतांना' अजूनही तरुण स्त्रिया आपले सर्व केस देवीला देतात.

कृषक समाजांमधील स्त्रिया सार्वत्रिक संमतीने उपभोगीत असलेल्या या चमत्कारिक लैंगिक स्वातंत्र्यामागील खरा उद्देश मोरोक्को व उत्तर आफ्रिकेमधील अरबांच्या तशाच चमत्कारिक प्रघातातून स्पष्ट होतो; फ्रेंचांनी जेव्हा त्यांना जिंकले व त्यांच्याबद्दल लिहिले तेव्हा इस्लामचा अंगीकार करून त्यांना हजारापेक्षा जास्त वर्षे झाली होती —

'मोरोक्को व उत्तर आफ्रिकेतील पवित्रतम धार्मिक गणभोजने लैंगिक स्वैराचाराच्या व वेश्याव्यवसायाच्या पर्वण्या असतात. वलद अब्दि गणाची वस्ती असलेल्या प्रदेशात स्त्रिया पराकाष्ठेचे स्वैराचारी जीवन व्यतीत करतात; त्या नेहमी आपल्या नवऱ्यांशी तलाक घेत असतात व लग्नांच्या मध्यंतरात आपल्या कुटुंबांमध्ये राहूनही अगदी सामान्य बाजारबसव्या बनतात. फ्रेंच अधिकाऱ्यांनी या अनवस्थेला प्रतिबंध घालायचे वारंवार प्रयत्न केले, पण त्यांना या शेतकरी जनतेकडून कडवा विरोध झाला. जनतेचे म्हणणे असे की भरघोस पिके घ्यायला अशी परिस्थिती आवश्यक आहे.'[५०]

केवळ याच संदर्भात केरळच्या एका भागात अगदी अलिकडच्या काळापर्यंत प्रचलित असलेली 'घृणास्पद' प्रथा समजू शकते —

'... न्यूहॉफच्या काळात हे (वेम्मणी) एक वेगळे राज्य असून त्याची राजधानी कार्टिकपिळ्ळी ही होती ... मानवप्राण्यांमध्ये अस्तित्वात असू शकेल असा विश्वासही बसणार नाही अशा घृणास्पद स्वरूपाचा कायदा या राज्यात प्रचलित असल्याचे हा डच कॅप्टन म्हणतो. तो सांगतो, "या भागात सर्वसामान्यपणे असे सांगण्यात येते की बातिमाच्या राजाने असा एक कायदा केलेला आहे की ज्याअन्वये कोणताही पुरुष त्याच्यावर अनुग्रह करायचे नाकारणाऱ्या कोणत्याही स्त्रीला जीवे मारू शकतो." या कायद्याचे वा रूढीचे यापूर्वीच्याही लेखकांनी उल्लेख केलेले आहेत. आर्चबिशप मेनेझेसने जेव्हा बातुनिएनाच्या राजाच्या प्रदेशातील 'कार्टियापिल्लीला' भेट दिली तेव्हा त्यालाही ही रूढी अस्तित्वात असलेली आढळली. ह्यू म्हणतो, "पुरुषांना कोणत्याही स्त्रीला शीलभ्रष्ट करायचा अधिकार आहे, मग तिचा दर्जा वा परिस्थिती कोणतीही असो; आणि जी कोणी स्त्री त्यांच्या पाशवी मागण्यांना विरोध करील तिला तेथेच मारून टाकायची परवानगी या कायद्याने दिलेली आहे."'[५१]

या प्रथेला वेश्याव्यवसाय म्हणणे सर्वथैव चुकीचे आहे. स्त्रीचे लैंगिक स्वातंत्र्य हिरावून व तिच्यावर एकपतित्व लादूनच स्त्रीजातीच्या सतीत्वाचे व

अनुक्रमणिका

[ ती म्हणाली, " मी दाशांची एक मुलगी आहे. तुझे भले होवो ! माझा पिता महात्मा दाशराजा याच्याकडून धर्मसंपादनासाठी नाव चालवायच्या ( कामगिरीवर ) मी नियुक्त झाले आहे. " ]

नदीवर नाव चालवण्यातून कोणते धर्मसंपादन होणार होते ? श्लोक १.६३.७२–७३ ते समजून घ्यायला आपल्याला मदत करतात–

" सङ्गमं मम कल्याणि कुरुष्व् " इत्य् अभ्यभाषत ।
सा अब्रवीद् " पश्य भगवन् पारावारे स्थितान् ऋषीन् ॥
आवयोर दृष्ययोर् एभिः कथं तु स्यात् सङ्गमः । "

[ ( पराशर तिला ) म्हणाला– " कल्याणी, माझ्याशी समागम कर ! " ती म्हणाली– " पहा, भगवन्. तीरावर ऋषी उभे आहेत. आपला संगम त्यांच्या डोळ्यादेखत कसा होऊ शकेल ? " ]

येथे सक्ती वा भीतीचा लवलेश नाही. ती ऋषीच्या शापाच्या भीतीने राजी झाली ही नंतरची कथा आहे ( १.१०९.१० ). योजलेल्या 'नियोग' या शब्दाचा अर्थ होतो 'संभोगासाठी नियुक्त केलेली.' तिच्या पित्याने तिची नेमणूक नदीपार जाऊ इच्छिणाऱ्या व तिची कामना करणाऱ्या प्रत्येकाशी समागम करण्यासाठी केलेली होती, आणि पराशर तिच्या कृपाप्रसादाचा एक भागीदार मात्र होता. कुत्रिम पाणीपुरवठ्याला सर्वात अगोदर जुंपल्या गेलेल्या नद्यांपैकी यमुना ही एक नदी आहे. बलरामाने यमुनेचे कसे दमन केले. याचे हरिवंश ( ४६.३०–५२ ) अत्यंत काव्यमय वर्णन करतो. तिच्याशी विधिपूर्वक समागम केल्यानंतर ( ४६.४५.४९ ) बलराम तिला आदेश देतो. ( ४६.५० )–

" लाङ्गल– आदिष्ट– मार्गा त्वम् इमं मे प्रियदर्शने ।
देशम् अम्ब * – प्रदानेन प्लावयस्व अखिलं शुभे ।। "

[ " प्रियदर्शने, माझ्या नांगराने खणलेल्या चारीतून वाहात जा; शुभे, जलप्रदानाने हा संपूर्ण ( व्रज ) देश जलथल करून टाक ! " ]

दाश गणाला भरघोस हंगामांचा लाभ व्हावा यासाठी काली सत्यवती यमुनेच्या पात्रात व 'धर्मतरीवर' स्वैरसंभोग करी.

या प्रश्नावर 'कुस जातक' ( ५३१ ) जास्त प्रकाश टाकते.[५१] कुसावतीच्या मल्लांचा राजा ओक्काक निपुत्रिक होता. मल्ल त्याच्या राजवाड्यासमोर जमले व त्यांनी आक्रोश केला – " राष्ट्राचा नाश होईल ! " राजाला

* 'अम्ब' चा अर्थ आई असाही होतो.



अनुक्रमणिका

सनातन रूढीसमोर मान तुकवून त्याच्या तिन्ही राण्यांना, धाकटी प्रथम, मधली नंतर, व थोरली, पट्टराणी ( महेसी ) शेवटी, 'धर्म–नटचा' म्हणून गणसदस्यांशी स्वैरसंभोग करायला पाठवाव्या लागल्या.

ही आकस्मिक वा अनार्य रूढी नव्हती. राम व त्याचे भाऊ, सीता, पांडव, द्रौपदी वा याज्ञसेनी, व प्राचीन काळच्या अनेक विख्यात व्यक्ती अशा धर्मनटचां-चीच अपत्ये होती.

गणप्रथाक भारतीयांच्या दृष्टीने गणाची सभा भरणे हेसुद्धा स्त्रीपुरुष समागमाचेच कृत्य होते. मज्झिमनिकाय[५४] समागमाला 'सन्निपात' हा शब्द वापरते ( माता–पितरो च सन्निपतितो होन्ति । ). अङ्गुत्तरनिकाय[५५] सारन्दद चैत्यात (मंदिरात) पाचशे लिच्छवींनी सभेसाठी जमायला 'सन्निपात' हाच शब्दप्रयोग करते ( तेन खो पन समयेन पञ्चमत्तानं लिच्छवि–सतानं सारन्ददे चेतिये सन्निपतितानं ... । ) जेथे ही सभा भरे त्या सभागृहालाच खुद्द 'सन्धा– आगार' असे म्हटले जाई. त्याचा अर्थ होतो समागमाचे घर. दक्षिण भारतातील मंदिर-अधिकाऱ्यांच्या बैठकीला 'योगम्' ( समागम ) असे म्हणतात.[५६]

म्हणून धर्म या शब्दाला प्रचलित अर्थ प्राप्त होण्यापूर्वी व मूलतः त्याचा अर्थ होता विधिपूर्वक स्वैरसमागम. रामायणाच्या (१.३६.२४) मते म्हणूनच पृथ्वीदेवता ही बहु-भार्या आहे.

धर्म–नटी हा समास बनवणारे धर्म व नटी हे दोन शब्द आपल्याला बरेचसे सांगू इच्छितात. आपण पहिला शब्द प्रथम घेऊ या. वैदिक कर्मकांड वा मायेतून निघालेले व तिचे समर्थन करणारे पूर्वमीमांसा तत्त्वज्ञान धर्माची व्याख्या वैदिक विधि वा आज्ञा म्हणजे धर्म अशी करते ( चोदना–लक्षणोऽर्थो धर्मः । )[५७] थॉमसन धर्म वा मायेची व्याख्या 'आज्ञा' अशीच करतात.[५८] आज्ञा कोणाला व कोणाची ? ती आज्ञा होती निसर्गाला व दिली जात असे तांत्रिक दृष्ट्या मागासलेल्या व संघटनात्मक दृष्ट्या एकसंघ गणातर्फे. मच्छजातक ( ७५ )[५९] याचे सर्वोत्कृष्ट उदाहरण आहे. एका पूर्वजन्मात बुद्ध कोसल देशातल्या श्रावस्तीच्या सीमेवरील एका तलावातील माशांचा राजा म्हणून जन्माला आला. आपल्या मत्स्य-गणाला ( ञाति–सङ्घ ) भडकल्या दुष्काळाच्या व घिरट्या घालणाऱ्या कावळ्यांच्या तडाख्यातून वाचवण्याकरता त्याने पज्जुन्न देवपुत्राला त्याचा जलकुंभ उपडा करायची आज्ञा केली ¶ –

¶ भारतीय शास्त्रीय संगीतातील मेघमल्हार रागही या वर्षाकार मायेची सर्वोच्च फलश्रुती आहे.

अनुक्रमणिका

"अभित्थनय पज्जुन्न ! निधिं काकस्स नासय !
काकं सोकाय रन्धेहि ! मञ् च सोका पमोचय ! "

[ "पर्जन्या, कडाडत व लखलखत ये ! कावळ्यांना त्यांच्या मेजवानी-पासून वंचित कर ! त्यांना शोकात बुडव ! आम्हाला शोकातून वर काढ ! " ]

इच्छित फलाच्या आशेची साथ या फलाकडे नेताना दिसत असलेल्या नैसर्गिक प्रक्रियेची गायन व नर्तनाद्वारे नक्कल करून दिली जात असे. नटी शब्दाची उत्पत्ती नट् या धातूपासून झाली असून त्याचा अर्थ आहे 'नक्कल करणे.' कोसंबी विवरण करतात—

'नाट्यचा मूळ अर्थ हल्ली होतो तसा अभिनय करणे असा नसून नक्कल करणे असाच आहे . . . उदाहरणार्थ, मृच्छकटिकम् नाटकातील ९ व्या अंकात खलनायक शकाराचे हर्षभराने नाचणे ( नर्तयति ) हा त्याचा साधासरळ दाखला आहे. अंक ३ मध्ये संवाहक पाठलाग करणाऱ्यांच्या तावडीतून निसटण्याकरता एका देवमूर्तीची जागा तिच्या अनेक मुद्रांची नक्कल करून घेतो : बहुविधं नाट्यं कृत्वा । ( ९ व्या अंकात ) शकाराला मोहाचा आविष्कार करायचा असतो तेव्हा तो त्या भावनेची नक्कल करतो : इति मोहं नाटयति । त्याच अंकात धक्का बसून, "आर्य, काय वेश्या तुझी मैत्रीण आहे," असा प्रश्न विचारणाऱ्या न्यायाधीशाला सशब्द उत्तर देण्या-ऐवजी नायक चारुदत्त लज्जेची नक्कल करतो ( लज्जां नाटयति । ). वध-स्थानाकडे नेला जाताना तो भयाची नक्कल करतो . . .'[६०]

अनेक ऋग्वेदीय सूक्ते अभिनय व गायन करायचे नाटकविधी होते—

'बहुतेक ऋग्वेदीय सूक्ते एक वा अनेक पुरोहितांनी सस्वर गान करण्या-करता आहेत. पण अपवादादाखल काही सूक्ते अशी आहेत की ज्यांची उपपत्ती प्रत्यक्ष विधीचे अवशेष याशिवाय दुसरी लावली जाऊ शकत नाही. उदाहरणार्थ, तीन ( वा चार ) पात्रे, इंद्र, इंद्राणी, व वृषाकपि ( कदाचित् त्याची पत्नीही ) १०.८६ या सूक्तात अभिनय करतात. हे सूक्त त्यातील उत्कट शृंगारिक ऋचांवरून कामहेतुक आहे यात शंका नाही... उर्वशी व पुरूरवस् यांचा संवाद ( यज्ञ करणाऱ्या ) मुख्य व्यक्तींच्या भूमिका वठवणाऱ्या दोन पात्रांनी करायच्या विधीचा एक भाग असणेच संभवनीय आहे व म्हणूनच तो त्यापूर्वीच्या काळात पुरुषाच्या दिल्या जाणाऱ्या प्रत्यक्ष बळीचे एक नाट्य-मात्र आहे ...'[६१]

१०.८६.१६ व १७ या ऋचांचा सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी केलेला अनुवाद खालीलप्रमाणे—

'१६. (मैथुनोत्सुक इंद्राणी म्हणते), 'हे इंद्रा, दोन मांड्यांच्या दरम्यान लोंबते लिंग असणारा मनुष्य संभोगास असमर्थ असतो. झोपल्या अवस्थेत ज्याचे लिंग ताठते तोच संभोग करू शकतो. इंद्र सर्वश्रेष्ठ आहे.'

'१७. (इंद्राणीच्या प्रस्तावाविषयी अनुत्सुकता दर्शविणारा इंद्र म्हणतो), 'हे इंद्राणी, दोन मांड्यांच्या दरम्यान लोंबते लिंग असणारा मनुष्यच ताठ-लिंगधारी व्यक्तीपेक्षा अधिक चांगला संभोग करतो. इंद्र सर्वश्रेष्ठ आहे.'' [६२]

अशा नाटकविधीत प्रधान भूमिका स्त्रीचीच असते. अश्वमेध यज्ञात अंबा, अंबिका व अंबालिका या तीन माता मारलेल्या घोड्याशी संभोग करायची नक्कल करतात व नंतर पुरोहितांशी स्वैरसंभोग करायचा अभिनय करतात.[६३] ही अंबात्रयी व या नाटकविधींच्या इतर नायिका या गणमाता होत्या व त्या नटी वा जनपदकल्याणी वा गणिका वा वैदिक परिभाषेत ब्रह्मवादिनी म्हणून काम करीत.

त्यांच्यावर मूळ जबाबदारी गणाच्या मायेची होती. माया हा वैदिक शब्द असून त्याचा अर्थ जादू असा होतो. चट्टोपाध्याय मायेच्या व्युत्पत्तीचे विवरण खालीलप्रमाणे करतात-

'... ... प्रकृतीसाठी दुसरा सुपरिचित पर्यायवाची शब्द आहे माया (वेदांती मायेचा उलट वाच्यार्थ असलेला) आणि असे सांगितले जाते की मा या मापणे असा अर्थ असलेल्या धातूपासून तो बनलेला आहे. उघड आहे की याच धातूनें संस्कृतला 'माता' हा शब्द दिलेला आहे ... ...' [६४]

ती काय मापत होती? उघड आहे- राष्ट्र या गणभूमी.

हे कसे काय की प्राचीन काळात स्त्री ही स्वैरसंभोग करीत असूनही 'पापी' समजली जात नव्हती? स्मृतिकार बौधायन घोषित करतो की, तिच्या पापांची शुद्धी रजोस्नाव करीत असतात-

'४. 'स्त्रियांपाशी शुद्धीची अद्वितीय साधने असतात; त्या सर्वस्वी दूषित कधीही होत नाहीत कारण दर महिन्याला येणारी विटाळाची पाळी त्यांची पापे धूत असते.'

'५. 'सोमाने त्यांना निर्मलता दिली, गंधर्वाने मंजुळ आवाज, व अग्नीने सर्व (अवयवांची) निर्दोषता; म्हणून स्त्रिया निष्कलंक असतात.' [६५]

म्हणूनच पराशर ऋषीने व सूर्य देवाने अनुक्रमे कालीला व कुंतीला आश्वासन दिली की प्रसूतीनंतर त्या आपले कौमार्य पुनश्च प्राप्त करतील. [६६] प्रत्येक मासिक पाळीनंतर वा जननाशौचानंतर परत कुमारी बनण्याच्या

अनुक्रमणिका

एकमेवाद्वितीय स्वभावधर्मामुळेच भारतातील मातृदेवतांना 'कुमारी' हे विशेषण प्राप्त झाले. दुर्गेचे महाभारतातील (४.६.७) एक नाव कुमारी हे आहे.

कौमार्याची दर महिन्याला पुनर्प्राप्ती याचा अर्थ यौवनाचे नित्य नूतनीकरण असाही होतो. म्हणून मातृदेवतेची चिरतरुणी म्हणून कल्पना केली गेलेली आहे. ७.६.२ ही अथर्ववेदीय ऋचा अदिति ही 'अजरन्ती' असल्याचे उद्घोषित करते.

वार्षिक हंगाम 'प्रसवल्यानंतर' भूमातेचे होणारे हे शुद्धीकरण व नूतनीकरण उछारल उत्सवाच्या स्वरूपात साजरे करायची मल्याळींची प्रथा आहे —

'उछारल शेतीच्या हंगामाची सांगता करीत असल्याने तो मकरम् (जानेवारी–फेब्रुवारी) महिन्याच्या शेवटी येतो. वर्षाच्या दुबार पिकाची तोपर्यंत कापणी होऊन गेलेली असते, आणि उन्हाळ्याला सुरवात होत असल्याने भूमी देवी पावसाळा सुरू होईतो विश्रांती घ्यायला जाते. "रोमन फेब्रुरियाप्रमाणे "या कालाच्या प्रारंभी मल्याळी या देवीच्या रजोदर्शनाचा उत्सव साजरा करतात. शेवटच्या तीन दिवसात, जेव्हा सर्व धान्यागारे बंद असतात, तेव्हा साळीची विक्री होत नाही व शेतीच्या कोणत्याही अवजाराला स्पर्श केला जात नाही. या दिवसात खायला लागणारा तांदूळही अगोदरच काढून ठेवला जातो. पहिल्या दिवशी संध्याकाळ व्हायच्या अगोदर धान्यागार बंद केले जाते व दाराला काटे व केरसुणीचे काही फड लावले जाऊन दारापुढे शेण व राख पसरली जाते नंतरचे दोन दिवस घरातल्या सर्वांना सुटी असते मग घराची झाडझूड करायची नाही, की घर सारवायचे नाही, की बागही झाडायची नाही वा तिला पाणी घालायचे नाही. चौथ्या दिवशी धान्यागार उघडले जाते व एक टोपलीभर पाने शेतात नेऊन ती थोडयाशा खताबरोबर जाळली जातात, ज्याचा उद्देश तो शेतकरीच कबजेदार आहे हे दाखवायचा असावा. उछारल ही अशी तिथी आहे की जेव्हा शेतीचे सर्व करारमदार संपुष्टात येतात व या व्यतिरिक्त इतर कोणत्याही वेळी मालमत्तेच्या ताब्याची मागणी करता येत नाही, ... वल्लुवनाड तालुक्यातल्या चेर्प्लाश्शेरीला व शोरनूरजवळ खास उछारल उत्सव होतात ज्यात गवताच्या बनवलेल्या जनावरांच्या प्रतिकृती मिरवणुकीने भगवतीच्या मंदिराकडे नेल्या जातात." '[६७]

प्राचीन मानवाच्या मते रजोस्राव हाच प्रजोत्पत्तीचे प्रत्यक्ष कारण होता.[६८] ग्रीक वैज्ञानिक तत्त्वज्ञ ॲरिस्टॉटल व भारतीय आयुर्वेद यांची अशीच धारणा होती.[६९] प्राचीन भारतीय रजोदर्शनाला 'ऋतुदर्शन' असा काव्यमय

शब्द वापरीत. म्हणून आल्यानंतर असुर राजकन्या शर्मिष्ठा इने ययाति राजाची तिचा मोहर सफल करायची ( " ... ऋतुं देहि नराधिप ॥ " ) व त्याची परिणती पुत्रफलात करायची ( " राज्ञा पुत्र-फलं देयम् ... । " ) याचना करते.[७०]

पालि धर्मग्रंथ जास्त निःसंदिग्ध आहेत—

'त्यावेळी मागध राजा सेनिय बिंबिसाराला भगंदर रोग झालेला होता; त्याची वस्त्रे रक्ताने भरून जात. जेव्हा राण्या ते पाहात तेव्हा त्या ( राजाची ) टिंगल करून ( म्हणत ) : 'महाराजांना विटाळ आला आहे. लौकरच महाराज प्रसव करतील ! ' ... '[७१]

ऱ्हाइस् डेव्हिड्स्चा हा अनुवाद आशयाचा यथातथ्य आविष्कार करीत नाही. शब्दशः अनुवाद असा होईल— " महाराज मोहरले आहेत; महाराजांना फुलोरा आला आहे; लौकरच महाराज फळ प्रसवतील ! " ( " उतुनी दानि देवो, पुप्फं देवस्स उप्पन्नं, न अचिरं देवो विजायिस्सति । " ).[७१]

या अशा समजुतीमुळेच केरळसारख्या मातृवंशक कृषक समाजांमध्ये मुलीची ऋतुप्राप्ती शरमेची गोष्ट मानली न जाता मोठ्या सणासारखी साजरी केली जात असे—

'थिरंडुकुली या नायरामधील ऋतुप्राप्तीच्या विधीचा प्रारंभ ऋतुमती मुलीला एक दिवा, एक पितळी भांडे, नारळाच्या मोहराचे एक पुंजके इ. वस्तु असलेल्या एका खोलीत वेगळे ठेवण्यातून होतो. मुलगी एक वाल्कान्नाटी, मूठ असलेला वर्तुळाकार पितळी पत्र्याचा आरसा, हातात धरते. नातेवाईक स्त्रिया आनंदाने आरोळ्या मारून या घटनेची घोषणा करतात ... आजू-बाजूच्या घरातील स्त्रिया मुलीला भेटायला येतात व नवी वस्त्रे भेट म्हणून देतात. नातेवाईक, मित्र व ग्रामस्थ यांना तिसऱ्या दिवशी आमंत्रित केले जाते. नायर जीवनक्रमात महत्वाचे स्थान असणारे मनर व वलन हे धोबी चौथ्या दिवशी येतात. मुलीला तिच्या मैत्रिणींसह तेल लावून लगतच्या तळ्यात आंघोळ घातली जाते. सर्व मंडळी मग वाजतगाजत मिरवणुकीने परतते. दरम्यान इकडे मुख्य इमारतीसमोर एक मंडप उभारला जातो व वाद्यगीतांच्या गजरात पाहुण्यांना आलीशान मेजवानी दिली जाते ... '[७२]

ऋतुप्राप्ती व इतर सुपीकता विधी साजरे करण्यातून निसर्गातही तशाच क्रियांचा संचार होतो असे मानले जात असे. असे मानले जाई की बहर-याच्या वेळी वनस्पतींना गर्भवती स्त्रियांप्रमाणे डोहाळे ( दोहद ) होतात;

अशोक वृक्ष युवतीच्या लत्ताप्रहाराने पुष्पित होतो, तर बकुळ तिने टाकलेल्या दारूच्या चुळीने ! [७४]

कुण्डपूव जातकातल्या उद्धृत केलेल्या वाक्प्रचाराचा शब्दशः अर्थ होतो– ‘जसे माणसाचे अन्न, तसेच त्याच्या दैवताला ( अर्पिलेले ) अन्न’ ( यथन्नो पुरिसो होति, तथन्ना तस्स देवता । ). मग निर्ऋतीचे अन्न कोणते होते ?

राजसूय यज्ञात, निर्ऋति जिची अधिष्ठात्री देवता आहे त्या परिवृक्ति नावाच्या यजमान राजाच्या परित्यक्ता पत्नीच्या घरात खालीलप्रमाणे चरू (कांजी) अर्पण केला जातो– ‘... परिवृक्तीच्या घरात (तो निर्ऋतीला नखांनी कवचापासून मोकळचा केलेल्या काळचा तांदुळाचा* चरु (अर्पण करतो) ( नैर्ऋतं चरुं परिवृक्त्यै गृहे कृष्णानां व्रीहीणां नख-निर्भिन्नं ... । ) ; [७५]

गार्हपत्य अग्नीचे होमकुंड बांधण्याबाबत तैत्तिरीय संहिता पुढीलप्रमाणे सूचना देते– ‘ निर्ऋतीसाठी ( साळीच्या ) कोंडचाने भाजलेल्या तीन काळचा ( विटा ) आहेत; कोंडा हा निर्ऋतीचा भाग आहे, निर्ऋतीचे रूप कृष्णवर्णी आहे ( नैर्ऋतीः कृष्णास् तिस्रस् तुष–पक्वा भवन्ति, निर्ऋत्यै वा एतद् भागधेयं यत् तुषा निर्ऋत्यैरूपम् । ) ...’ [७६]

निर्ऋतीचे अन्न काळा तांदूळ होते, तर आर्यांचे जव ( यव ). शतपथ ब्राह्मण सांगतो की जव सोडून बाकी सर्व अन्नधान्ये असुरांची आहेत. [७७] बौद्ध धर्मग्रंथ दीघनिकाय नमूद करतो की अकृष्ट-पच्य देव–साळ ( अकट्ठ-पाको सालि ) हे मानवाने शोधून काढलेले पहिले अन्नधान्य आहे [७८]

केरळच्या कृषिदासांना आंशिक रोज काळचा तांदुळात दिला जात असे, ज्याचे नाव, आश्चर्यकारक तर खरेच, निर्ऋतीसारखेच आहे–

‘ जेव्हा साळीची कापणी होते तेव्हा त्यांना ( पुलयांना ) तिचा दहावा हिस्सा रोजादाखल मिळतो व चौदा दिवसानंतर उगवणाऱ्या नीरब नावाच्या काळचा साळीच्या मुठचाही † त्यांना खुशालीदाखल मिळतात ... ’ [७९]

परंपरा सांगते की या दास जाती दक्षिण भारताच्या मूळ रहिवासी होत्या, आणि चोल राजांनी त्यांना जिंकून दास करायच्या आधी ते स्वतंत्र व समृद्ध लोक होते. पुलयांची अजून स्वतःची मंदिरे आहेत, व सर्करायला एक तण्ड पुलयन् पुजाऱ्याचे काम करतो–

---

* काळी कमोद.

† मुष्टि, पाणिनि सूत्र ३.२.२९, वार्तिक २.

'... तंजावर जिल्ह्यात तिरुवलुर येथे होणाऱ्या शिवोत्सवात परयनांचा मुख्य मानाचे चिन्ह असलेली याकच्या शेपटाची चवरी हातात घेऊन देवाच्या मूर्तीबरोबर हत्तीवर बसतो. श्रीपेरुम्बदुरच्या देवतेच्या मूर्तीचा एक परयन् वर्षातून एकदा धर्मपती बनतो. परया जातीचे वेल्लुवन पुजारी ब्राह्मणांच्या आगमनाअगोदरच काय परंतु काही काळ नंतरही पल्लव राजांच्या पदरी तेच काम करीत होते, ही एच्. ए. स्टुअर्टने १८७१ च्या जनगणना अहवालात नमूद केलेली माहिती बहुधा खरी असली पाहिजे ...' [८०]

नंबूदिरीपाद म्हणतात–

'... शतकानुशतकाच्या ब्राह्मणी वर्चस्वाला न जुमानता घाटमाथ्याबरच काय परंतु सपाटीवर व किनाऱ्यावरही ब्राह्मणेतर दैवतांची पूजाअर्चा चालू आहे हे मोठे वैशिष्ट्यपूर्ण आहे. यापैकी बऱ्याच दैवतांचे ब्राह्मणीकरण करून त्यावर ब्राह्मणांनी आपला ताबा बसवलेला आहे पण बरीच दैवते अजूनही ब्राह्मणेतरांच्याच ताब्यात असून त्यांची नावे, पूजाअर्चेची पद्धत, इ. अब्राह्मणीच आहे ...' [८१]

ही अब्राह्मणी देवळे मुख्यतः मातृदेवतांची आहेत. मातृदेवता असंख्य आहेत. महाभारत ( ९.४६ ) सांगते की असुरांविरुद्ध लढायला निघालेल्या देवांच्या सेनेचे नेतृत्व स्कंदाने केले तेव्हा त्याच्याबरोबर असंख्य मातृदेवता होत्या. मुख्य मातृदेवता आठ किंवा सात आहेत. आठ मातृदेवता खालीलप्रमाणे आहेत.

ब्राह्मी माहेश्वरी च ऐन्द्री वाराही वैष्णवी तथा ।
कौमारी इत्य् अपि चामुण्डा चर्चिका इत्य् अष्ट मातरः ॥

[ ब्राह्मी, माहेश्वरी, ऐंद्री, वाराही, वैष्णवी, कौमारी, चामुंडा अशा आठ माता आहेत. ]

अमरकोष ( ७० ) सात मातांची गणना खालीलप्रमाणे करतो–

ब्राह्मी माहेश्वरी च एव कौमारी वैष्णवी तथा ।
वाराही च तथा इन्द्राणी चामुण्डा सप्त मातरः ॥

दुर्गा हे बंगालचे सर्वात मोठे दैवत आहे महाराष्ट्रात सात मातांची सात देवळे आहेत. सर्वात मोठी बहीण सप्तशृंगी ( सात शिंगी ) इचे देऊळ नाशिक जिल्ह्यात आहे, आणि चैत्री पौर्णिमेला भरणारी तिची जत्रा महाराष्ट्रातली एक सर्वात मोठी यात्रा आहे. सगळ्यात धाकटी बहीण एकवीरा ( एक वीर असलेली ) इचे देऊळ धुळ्याला स्मशानभूमीशेजारी आहे. या दोन्ही देवींचे

अनुक्रमणिका

पुजारी गायन–वादन करणाऱ्या ब्राह्मणेतर गुरव जातीचे भोपे आहेत. महालक्ष्मी या ठाणे जिल्ह्यातील प्रसिद्ध आदिवासी देवीचे वंशपरंपरा पुजारीपण खुद्द आदिवासी वारल्यांचेच एक कुटुंब करीत आहे.

या देवींच्या भेसूर मूर्ती व भडक देवळे ही आधुनिक काळाची करामत आहे. मुळात देवीचे दिग्दर्शन करणारा एक आकारहीन दगड पवित्र वनातल्या मातीच्या ओटयावर ठेवलेला असायचा. असे पवित्र वन महाराष्ट्रात अजूनही ' वाडी ' या नावाने ओळखले जाते. आसाममधल्या खासीच्या प्रत्येक खेडयाची स्वतःची वाडी असे.[८२] वज्जि संघाच्या गणदेवतेची पुजारीण असलेल्या अंबपालीची स्वतःची अंबवन ( मातेचे वन ) नावाची वाडी होती हे अगोदर सांगितले गेलेलेच आहे.

सी. कुव्हन् राजा यांच्या मते मातृदेवतांची वाडयांमध्ये पूजाअर्चा करायची प्रथा वैदिक काळाच्या पूर्वीची, द्रविडी उगमाची असावी –

' वेदांचे देव वनदैवते नाहीत. ते घोडे जुंपलेले रथ चालवीत व वैदिक देवांचा शिकारीशी संबंधित असा काहीही उल्लेख आढळत नाही. पण जेव्हा आपण हिंदु धर्माच्या अवैदिक देवांकडे येतो तेव्हा आपल्याला ते वनाशी व शिकारीशी निगडित असल्याचे दिसते. हिंदु धर्माचे सर्व शैव देव अवैदिक असून द्रविडी असल्याचे मानले जातात. विशेष उल्लेखनीय दोन दैवते आहेत. काली वा दुर्गा व अय्यप्पन् ( एक द्रविडी देव जो शिव व समुद्रमंथनानंतर देवांना अमृत वाटणाऱ्या मायारूपी विष्णु यांचे अपत्य होता ). दक्षिण भारताच्या काही भागात या दोन दैवतांच्या देवळांना कावु म्हणतात, ज्याचा अर्थ होतो वन वा वाडी. यावरून असे दिसते की या दैवतांची पूजा वनांमध्ये वा वाडयांमध्ये होत असे. नागप्रतिमांची जेथे प्रतिष्ठापना केलेली असते व पूजा होते त्या स्थानांनासुद्धा याच नावाने ओळखले जाते...'[८३]

वाडीप्रतिष्ठित मातृदेवतांच्या संस्थेचे जनकत्व केवळ द्रविडांकडे देणे चुकीचे ठरेल. तरी हे मात्र निश्चित की तिचा उगम आर्यपूर्व काळातला होता आणि भारताच्या सबंध इतिहासात व भारतभर ती अब्राह्मणी संस्था म्हणूनच अस्तित्वात राहिलेली आहे. मातृदेवता ही मुळात दैवीकरण झालेली गणमाताच होती. म्हणून मातृदेवता पूजक समाजांना मृगयाप्रधान म्हणणेही चुकीचे आहे. ते असे कृषिप्रधान समाज होते की ज्यात स्त्रिया शेती करीत व पुरुष शिकार.

निर्ऋतीची पूजा आकारहीन दगडाच्या स्वरूपात होत असे हे शतपथ ब्राह्मणातील खालील उताऱ्यावरून स्पष्ट होते –

'( खडकाडोंगरांचे प्रतीक असलेला ) तो दगड जलकुंभात घालून मग तो ते त्या ( नैर्ऋत्य ) दिशेला फेकतात, कारण तोच निर्ऋतीचा प्रदेश आहे.'[८४]

दगड आत असलेला जलकुंभ हे गर्भ असलेल्या गर्भाशयाचे प्रतीक आहे. दुर्गापूजेत केवळ 'पूर्ण–घटाचीच' पूजा होते.[८५]

निर्ऋति ही जल किंवा नदी देवता होती हे अगोदर सांगितले गेलेलेच आहे. अप्सरस्चे मराठी रूप आहे आसरा. नदीतील विशिष्ट दगड वा खडकांना आसरा म्हणून ओळखले जाते, जेथे बाळंतीण बाया अजूनही तान्ह्या मुलाला घेऊन जातात व त्याला झोळीत घालून झोके द्यायची 'नक्कल' करतात. *

सेमेटिक लोक लाकूड व दगडाची पूजा करीत. जे मूर्तिपूजक दगडाची माता म्हणून व लाकडाची पिता म्हणून पूजा करतात त्यांची बायबलचा जेरे-मियाह् निर्भर्त्सना करतो–

'. . . जेरेमियाह् मूर्तिपूजकांचे वर्णन करतो की ते लाकडाच्या खोडाला म्हणतात, तू माझा पिता आहेस, व दगडाला म्हणतात, तू मला जन्म दिला आहेस . . .'[८६]

कोणाला असे वाटेल की जेरेमियाह् जणू काय १२.१.१२ या अथर्व-वेदीय ऋचेच्या ऋषीचीच निर्भर्त्सना करीत आहे–

. . . माता भूमिः पुत्रो अहं पृथिव्याः ॥
पर्जन्यः पिता . . . ॥

['. . . भूमी माता आहे, पृथ्वीचा मी पुत्र आहे. पर्जन्य पिता आहे . . .'][८७]

या दगड व खोडावरून असा निष्कर्ष काढणे चुकीचे होईल की त्यांच्या भक्तांना वास्तुशास्त्र व मूर्तिकला माहित नव्हत्या–

'. . . . . . कलांनी बरीच प्रगती केल्यानंतरही सेमेटिक लोकांना आपल्या पवित्र प्रतीकांना देवांचा आकार द्यायची गरज भासली नाही. टायरमध्ये मेलका-र्थची पूजा दोन खांबांच्या स्वरूपात होई, व थेट रोमन काळापर्यंत पॅफॉसच्या महामंदिरात अस्तार्तेची प्रतिमा मानवाकारी नसून शंकूच्या आकाराचा एक दगड होता . . .'[८८]

काबाचा पवित्र काळा पाषाण मुळात अल्–उझ्झा या अरबस्तानच्या आद्य मातृदेवतेचे प्रतीक होता –

* या विधीला म्हणतात 'मुलाला घुगरवणे.' सुताराने बनवून दिलेली आंब्याच्या लाकडाची पाळणा, फणी, इ० खेळणी तेथेच टाकून येतात.

'अरबस्तानची महादेवी सर्वसामान्यपणे अल्–उझ्झा म्हणून ओळखली जाई. अल्–किंदी आपल्याला सांगतो की अल्–उझ्झा म्हणजे चंद्र आहे. तिचे मुख्य मंदिर, आणि अरबस्तानचे सर्वात प्रसिद्ध व पवित्र स्थान, मक्केचे काबा हे होते. या पवित्र स्थानाचे वतनदार असलेला कुरैश गण ( कबीला ) इस्लाम-पूर्व काळात तिची पुरोहित जाति होता व म्हणूनच त्याला ' अब्द अल्–उस्सा ' ' अल्–उझ्झाचे दास ' अशी पदवी होती. पण मक्केच्या मंदिरात तिची प्रत्यक्ष सेवा वृद्ध पुजारिणी करीत. अजूनही काबाच्या पालकांना बनु साहेबाह्, ' म्हातारीची मुले, ' असे ओळखले जाते ... ... काबात या महादेवीची पूजा तीच एका पवित्र पाषाणाच्या स्वरूपात केली जात असे, आणि यात शंका नाही की हा इस्लामला पवित्रतम असलेला सुप्रसिद्ध काळा पाषाण आहे. सर्व अरबी गणांचे समान धर्मबंधनाद्वारे राजकीय ऐक्य घडवून आणायच्या ध्येयाने प्रेरित झालेल्या मुहम्मदने जरी जुन्या धर्माच्या सर्व जुन्या ' मूर्ती ' नष्ट केल्या, तरी जुन्या धर्माची ही पवित्रतम वस्तु वा प्रतीक नष्ट करणे मात्र त्याने अनावश्यक वा अव्यवहार्य मानले. जगाच्या कानाकोपऱ्यातून मक्केला जाणाऱ्या मुस्लिम यात्रेकरूंचे अजूनही मुख्य उद्दिष्ट असते अरबस्तानच्या महादेवीच्या या प्राचीन प्रतिमेचे चुंबन घेणे. सेमेटिक व ग्रीक देशांमधल्या इतर मंदिरांप्रमाणे या देवीचा शंकुआकारी पाषाण एका पवित्र जलस्रोतापाशी वा विहिरीपाशी, झमझमपाशी, उभा होता, जिचे पवित्र पाणी सर्व सच्चे मुस्लीम पीत असतात... ... '[८९]

अल्–उझ्झाला चंद्र समजणे चुकीचे आहे; कारण चंद्र हा निःसंदिग्धपणे सिन् या नावाने ओळखला जात होता–

' प्राचीन बाबिलोनियात चंद्रदेवाचे सर्वसामान्य नाव सिन् असे होते व सीरियात चंद्राचे अजून तेच नाव रूढ आहे आजतागायत कुर्द लोक चंद्राला शेख सिन् असे म्हणतात. या द्वीपकल्पाच्या दक्षिणतम टोकापर्यंतच्या अरबी सर्व शिलालेखांमध्ये हे नाव तेवढयाच प्रामुख्याने आढळते ... ... '[९०]

अस्तार्ते व निर्ऋति यांच्याप्रमाणेच अल्–उझ्झा ही अरबांची भूमाता होती.

**निर्ऋतीला नैर्ऋत्य दिशा विशेष पवित्र का होती ? जर ती तथाकथित मृत्यूची देवता होती तर तिची दिशा मृत्यूदेव यमाची वा पितरांची दक्षिण दिशा, असायला पाहिजे होती.**

नैऋत्य दिशा ही केरळच्या प्राचीन व मध्ययुगीन लोकांचीही पवित्रतम दिशा होती. प्रत्येक खेड्याचे स्वतःचे सभागृह वा सभास्थान असे व ते ग्राम-मंदिराच्या नैऋत्य दिशेला असे–

'कोल्लम् वर्ष ३८४ ( इ. स. १२०९ ) च्या शिलालेखात आपण वाचतो, " ( भट्टारका ) च्या ( सन्माननीय अध्यक्षतेखाली ) मित्रानंदपुरमच्या दक्षिण ( सभागृहा ) त भरलेल्या थिरुवंयपुरम् सभेत व तिच्या सभंजिताच्या उपस्थितीत इ. " यावर टिप्पणी करताना प्राध्यापक सुंदरम् पिल्लाइ शेरा मारतात, " यात शंका नाही की ३८४ त त्रिवेंद्रम्ला इतर अनेक खेड्यांप्रमाणे सभंजित वा सभापतीसह सभा होती, आणि ती श्री पद्मनाभ मंदिराच्या पश्चिमेला दोन फर्लांगावर असलेल्या मित्रानंदपुरम्च्या प्राचीन मंदिरात महत्वाच्या प्रसंगी भरत असे. या मंदिराच्या प्रांगणातील नैऋत्येच्या कोपऱ्याकडे पूर्वापार काळापासून सभा भरायचे पवित्र ठिकाण म्हणून बोट दाखविले जाते, आणि एका शिलालेखात आलेल्या " टेक् " वा दक्षिण या शब्दामुळे या ठिकाणाच्या निश्चिततेबद्दल शंका राहात नाही. या सभागृहाचा चौथरा अजून कायम आहे. ...[११]

पृथ्वीला ' सर्प-राज्ञी " म्हणत हे अगोदरच दाखवले गेले आहे. कद्रू वा पृथ्वी[१२] ही सर्पांची माता होती; म्हणून सर्पांना काद्रवेय असेही म्हणत. जेव्हा भूमाता आपली कन्या सीता इला आपल्या घरी पाताळात ( रसातलात ) घेऊन गेली तेव्हा तिचे सिंहासन सर्पांनी डोक्यावर धरलेले होते (७.९७.१९). रसातलाला नागलोक असेही म्हणतात.[१३] पूर्वापार काळापासून अशी श्रद्धा आहे की सर्प कात टाकायच्या आपल्या शक्तीमुळे अमर आहेत.[१४] म्हणून ऋतुमतितेतून नूतनीकरण करायच्या स्त्रियांच्या सामर्थ्यामुळे त्यांचे सर्पांशी समीकरण केले गेलेले आहे. बाण आपल्या कादंबरीत कथन करतो की राणी विलासवती आपली निपुत्रिकता नष्ट करण्याकरता नागदेवतांच्या सरोवरांमध्ये आंघोळ करी ( प्रसिद्धेषु नाग-कुल-ह्रदेषु ममज्ज । ). धुळे जिल्ह्यातील साक्री तालुक्यात नागाई नावाचे असेच एक कुंड आहे.

सर्पांच्या पृथ्वीशी असलेल्या या सारूप्यामुळे गृह्यसूत्रे श्रावण महिन्यात श्रवणा यज्ञ करायचा आदेश देतात.[१५] पारस्कर गृह्य सूत्र सांगते की राजा वरुण व त्याचे ज्ञातिजन यांना श्रवणा यज्ञात आवाहन करावे. विधुर जातक (५४५) म्हणते की वरुण हा सर्पांचा राजा होता.[१६] यावरून वरुण हा धरणी देवीचा एकतर दैवी पती होता वा पुत्र होता असे दिसते. म्हणून श्रवणा यज्ञ हा केवळ सर्पांपासून संरक्षण करायचा विधी नसून भरघोस पीक मिळवायचा विधी होता. या विधीच्या पाठोपाठ येणाऱ्या सीतायज्ञातून हे सिद्ध होते.

अनुक्रमणिका

या संदर्भातच नायरांच्या थरवाड गृहभूमीच्या नैर्ऋत्य कोपऱ्यात असणाऱ्या सर्पवाडीचे महत्व लक्षात येईल—

'थरवाड-गृहाच्या रचनेत व बाह्यस्वरूपात अनेक कुतूहलजनक वैशिष्टे दिसतात. ज्या जमिनीवर ते बांधलेले असते ती किंचित पूर्वेकडे उतरती असते. एका चौरस सीमारेषेने तिची मर्यादा आखलेली असून तिचे सारखे चार भाग पाडलेले असतात. या जमिनीचे ईशान्य व नैर्ऋत्य भाग निरनिराळ्या इमारतींसाठी उपयोगात आणले जातात. व आग्नेय कोपऱ्यात स्मशान असते. नैर्ऋत्य कोपऱ्याच्या मध्यभागी नायरांच्या धार्मिक जीवनात अत्यंत महत्वाचे स्थान असलेली सर्पवाडी वसलेली असते'.....[९७]

या सर्पवाडीला नागट्टन् कावु म्हणतात व रजस्वला स्त्रियांना तिच्या जवळ यायची मनाई असते.[९८]

ही दिशा एवढी पवित्र असायचे कारण ती जीवनदायी पावसाची प्रेषक होती हे असावे.

'.....चेरन्चे मिथुनम्मधील (जून-जुलै) थिरुवाथिर (सहावे नक्षत्र), चोलनचे थुलाम्मधील (आक्टोबर-नोव्हेंबर) स्वाति (१६ वे चांद्र नक्षत्र), पांड्यन्चे कुंभम्मधील (फेब्रुवारी-मार्च) मूलम् (१९ वे नक्षत्र), हे मान्सूनचे जन्मदिवस लक्षात ठेवले पाहिजेत. कारण या मंगल दिवशी मलबारमध्ये नैर्ऋत्य मान्सून वारे, चोल राज्यात ईशान्य मान्सून वारे या थुला वर्षम्, व पांड्य राज्यात पावसाळी वारे वाहायला लागतात.....'[९९]

महान् आर्यपूर्व संस्कृतीची हरप्पा व मोहेंजोदारो ही शहरे अनुक्रमे रावी व सिंधु नद्यांच्या तीरावर वसलेली होती. या नद्या दर वर्षी अंथरीत असलेल्या गाळांनी पोसलेल्या पिकांनी संस्कृती जन्माला घातली व वाढवली, आणि पंजाबमध्ये प्रवेश केल्यापासून अरबी सागराला मिळेपर्यंत सिंधूची स्थूल मानाने वाहायची दिशा आहे नैर्ऋत्य.

सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्या मते निर्ऋतीचे एक विशेषण त्रि-युत असेही होते. हा पाठभेद शास्त्रीबुवांची स्वैर सृष्टी नाही हे खुद्द ऋग्वेदच सिद्ध करतो. ८.२४.२४ ही ऋचा सांगते की इंद्र हा निर्ऋतींचा ज्ञाता आहे (वेत्था हि निर्ऋतीनाम् ..... ।) त्याचा अर्थ असा की निर्ऋतीची कल्पना अनेकवचनात केली जात होती. १०.११४.२ ही ऋचा निर्णायक पुरावा सादर करते.

'आदेश दिल्याप्रमाणे पुरोहित दुरून ऐकतात, निर्ऋतित्रयीची ते सेवा करतात, कारण तेच तिला चांगले जाणतात.

दूर गूढ गृहांमध्ये राहून या कवींनी आदिकारण असलेल्या (त्रि–अंबेचा) छडा लावलेला आहे.'[१००]

ऋग्वेदात एकूण १० आप्री सूक्ते आहेत. १.१३,१४२,१८८;२.३;३.४; ५.५;७.२;९.५;१०.७०,११०. यज्ञपशूला मारण्याआधी आप्री मंत्र म्हटले जात व अग्नी त्याच्या भोवती फिरवला जाई.[१०१] आप्री दैवते अकरा" असून ती पुढीलप्रमाणे आहेत– १) सुप्रसिद्ध अग्नि, २) तनूनपात वा नराशंस अग्नि, ३) इळ अग्नि, ४) बर्हि, (दर्भ), ५) द्वार, ६) उषासानक्त (उषा व रात्र) ७) दैवी होतृद्वय, ८) तिस्रो देव्यः (देवीत्रय), ९) त्वष्ट्र, १०) वनस्पति (यज्ञीय यप), व ११) स्वाहा[१०२] भाष्यकारांच्या मते या तीन देवी आहेत– १) सरस्वती (नदी), २) इळा (पृथ्वी वा अन्न), व ३) भारती (वाक्).[१०३] यावरून आपण असा निष्कर्ष काढू शकतो की हे देवीत्रय अनार्य होते.[१०४]

'वेदिक इंडेक्स'[१०५] म्हणते– '.....आप्री सूक्तांमध्ये भारती नावाची देवी आढळते जी भरताची अधिष्ठात्री देवता आहे......' निघण्टु वाक्‌ची दोन पर्यायवाची नावे देतो. भारती (१.११.१६), व गण (१.११.३८). ९.९७.३४ ही ऋचा वाक्‌चे वाक्‌त्रय (तिस्रो वाचः।) म्हणूनही आवाहन करते.

राजसूय यज्ञाचा प्रारंभ निर्ऋतीला हवी अर्पण करायच्या ज्या तीन मंत्रांनी होतो त्यांचा खुलासा कीथ पुढीलप्रमाणे करतो–

'. पहिल्या (मंत्राने) रुद्राला तुष्ट करण्यासाठी गार्हपत्य (अग्नीत) हवन केले जाते; नंतर यजमान हातात त्यातले एक जळते लाकूड घेऊन दक्षिण दिशेने जातो जेथे नैसर्गिक घळ (इरिण) आहे तेथे, आणि ते तेथे ठेवून दुसऱ्या मंत्राने हवन करतो; ......'[१०६]

हा विधि स्पष्ट करतो की तीन अंबा वा त्र्यंबकाच्या माता दुसऱ्या तिसऱ्या कोणीही नसून खुद्द निर्ऋतीच होती. अश्वमेध यज्ञात अंबा, अंबिका व अंबालिका या तीन माता मारलेल्या घोड्याशी संभोगाची नक्कल करतात व त्याला 'गणपति' असे संबोधतात.[१०७] यावरून हे उघड होते की निर्ऋति ही गणाची त्रि–अंबा होती.

निर्ऋतीची तीन वैशिष्ट्ये 'तिस्रो देव्यः' वरून स्पष्ट होतात. निर्ऋति ही (१) सरस्–वती वा नदीदेवता होती, (२) इळा वा भूमाता होती, व (३) भारती वा गणमाता होती.

हे त्रि–अंबेचे वैशिष्ट्य भारतापुरतेच मर्यादित नाही. प्राचीन ग्रीकांची मॉइराइ ही त्रि–अंबाच होती–

'... इतर सर्व ग्रीक देववाणी–मंदिरांप्रमाणे डेल्फीचे देववाणी–मंदिरही त्रिमुखी नियतिरूपातल्या मातृदेवतांचे व देवपुत्राचे भविष्यवेत्ते मंदिर होते. एस्किलस् आपल्याला सांगतो की अपोलोने देववाणीचा वारसा गैआ, थेमिस् व फिबी यांच्यापासून घेतला, ही त्या त्रिमुखी महादेवीची भौतिक, नियतिक व स्वर्गीय अशा तीन स्वरूपांची नावे होती. डेल्फीच्या देवतायतनात मॉइराइचे एक उपमंदिर होते. डेल्फीच्या देवतांचा केवळ 'त्रयी' म्हणून निदश केला जात असे... ...'[१०८]

अरबांची महादेवी अल्–उझ्झा हीसुद्धा त्रि–युत होती–

'.... ही महादेवी एकाच वेळी एक व तीन, "तीन पवित्र कुमारिका," अल्–इलत्, अल्–उझ्झा व मनत् असल्याने त्रियुत होती. 'अल्–उझ्झा' हे केवळ एक धार्मिक संबोधन असून त्याचा अर्थ होतो 'शक्ती'; अल्–इलत् हे इलु वा अल्लाहचे स्त्रीलिंगी रूप असून त्याचा अर्थ "देवी" असा होऊ शकतो. मनीचे स्त्रीलिंगी रूप मनत् असून विशेषतः नियति वा दैव या अर्थाचे ते वाचक होते. अरब 'मन' हा शब्द अजूनही 'नशीब' या अर्थी सर्रास वापरतात. अशा प्रकारे या त्रियुत अरबी देवीचे ग्रीक मॉइराइ, नियतित्रयी व नॉर्डिक नॉर्नेज् यांच्याशी साधर्म्य आहे.'[१०९]

या त्रियुत देवींच्या आर्थिक व सामाजिक कार्यांवर थॉमसन प्रकाश टाकतात –

'मॉइराईंची उत्पत्ति पूर्वजांच्या प्रथांचे साक्षात् अवतार म्हणून, आणि शिकारीचे वाटप, लुटीचे वाटप, जमिनीचे वाटप व कुलांमध्ये श्रमाचे वाटप या आद्य साम्यवादाच्या आर्थिक व सामाजिक कार्यांची प्रतीके म्हणून झाली; म्हणजे, त्या नवपाषाणयुगीन मातृदेवतांमधून साकार झाल्या, तर या मातृदेवता माणसे जेव्हापासून मातृसत्ताक कुलजीवन जगू लागली तेव्हापासून त्यांच्यावर सामूहिकपणे निरंकुश शासन चालवीत आलेल्या कुलपांची दैवी रूपे होती. जगाच्या प्रारंभकाली मॉइराइ या सर्वश्रेष्ठ होत्या याची एस्किलस्ला आठवण होती.'[११०]

१०.११४.३ ही ऋचा निर्ऋतीबद्दल जास्त माहिती पुरवते––

चतुष्–कपर्दा युवतिः सुपेशाः घृतप्रतीका वयुनानि वस्ते ।
तस्यां सुपर्णा वृषणा नि सेदतुः यत्र देवाः दधिरे भागधेयम् ॥

[ 'यौवनशाली, चारुगात्री, तेलाने तेजाळलेला केशसंभार चार वेण्यात गुंफलेली ( निर्ऋति ) ऋतंभरा आहे.

अनुक्रमणिका

जेथे ती देवांना त्यांचे भाग वाटते तेथे तिच्याजवळ दोन महाबली पक्षी बसलेले आहेत. ' ][१११]

१०.११४ ८ ही ऋचा निर्ऋति व वाक् एक असल्याचे सांगते. गणमाता निर्ऋतीचे कार्य होते गणधनाचे गणसदस्यात समान वाटप करणे.

सिंधु संस्कृतीच्या एका मुद्रेवर यज्ञाचा देखावा दाखवलेला आहे. डोक्यावर त्रिशृंगी मुकुट असलेली एक महानग्नी देवता पिंपळाच्या (अश्वत्थाच्या) झाडात उभी असून पक्षाचे मुखवटे घातलेले पुरोहित तिची पूजा करीत आहेत.[११२] ओषधिसूक्त म्हणते की पिंपळाचे झाड हे वनस्पतींचे घर आहे ( अश्वत्थे वो निषसदनं....। ).[११३] १.१४.७ या ऋचेनुसार निर्ऋतिवंशज वरुणाचा मंगलवृक्षही पिंपळच होता.[११४]

निर्ऋतीची ही तीन वैशिष्टये, पाणी, पृथ्वी व गण यांचे अधिपत्य, कालानुक्रमात तीन गुणांमध्ये परिणत झाली. १०.१२१.१ या ऋचेचे विवरण करताना निरुक्त ( १०.२३ ) म्हणते– '... जेव्हा स्त्रीच्या ( योनीत ) शुक्रजंतूंचा ( गुणान् ) उत्सर्ग होतो व तिचे स्वतःचे शुक्रजंतु ( गुणाः ) त्यात सम्मीलित होतात, तेव्हा गर्भधारणा होते....'[११५] पाणी पांढरे आहे, तसाच आहे सत्त्वगुण; पृथ्वी काळी आहे, तसाच आहे तमोगुण; गणाधिपत्य लाल आहे. तसाच आहे रजोगुण. निर्ऋतीची सांख्य तत्त्वज्ञानातली परिणती, प्रकृति, अगणित पुरुषांशी स्वैरसंभोग करून विश्वाची निर्मिती करीत असते—

अजाम् एकां लोहित–शुक्ल–कृष्णां
बह्वीः प्रजाः सृजमानां सरूपाः ।
अजो ह्य् एको जुषमाणोऽनुशेते
जहात्य् एनां भुक्तभोगाम् अजोऽन्यः ॥

[ 'लाल, पांढरी व काळी असलेली एक अजन्मा ( प्रकृति ) तिच्याच सारख्या अगणित प्रजेची सृष्टी करते; एक अजन्मा ( पुरुष ) तिच्याजवळ पहुडून ( संभोग ) आनंद घेत आहे, तर तिला ( संभोग ) आनंद दिलेला दुसरा अजन्मा ( पुरुष ) तिला सोडून जात आहे.[११६] ]

संदर्भ —

१. वाजसनेयी संहिता, १२.६२–६६.
२. ए० बी० कीथ, द वेद ऑफ द ब्लॅक यजुस् स्कूल, एच० ओ० एस० खंड १९, पा० ३१४–३१५.
३. दा० ध० कोसंबी, मिथ अँड रिॲलिटी, पा० ६४.

४. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २२, पा० २६६.
५. एम्० विंटरनित्झ, हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर, खंड १, पा० ६९; देवीप्रसाद चट्टोपाध्याय, लोकायत, पा० ५२९.
६. लक्ष्मण सरूप, निघण्टु अँड निरुक्त, पा० २७.
७. उक्त, पा० ७.
८. उक्त.
९. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, द मदर्स, खंड २, पा० ५६३–५६७.
१०. दा० ध० कोसंबी, द कल्चर अँड सिव्हिलिझेशन ऑफ एन्शंट इंडिया इन हिस्टॉरिकल आउटलाइन, पा० ८१.
११. डब्ल्यू० रॉबर्टसन स्मिथ, रिलिजन ऑफ द सेमाइट्स, पा० ९२–९३.
१२. तैत्तिरीय संहिता, १·८-१; वाजसनेयि संहिता, ९·३५.
१३. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ४१, पा० ५८–६०.
१४. जगदीश काश्यप ( सं० ), जातकपालि, १०९·१०९.
१५. श्रीधरशास्त्री पाठक, वाजसनेयि संहिता, पा० १९७.
१६. तैत्तिरीय संहिता, ४·२·६; वाजसनेयि संहिता, १२.७५–१०२.
१७. श्रीधरशास्त्री पाठक, उक्त, पा० १९७.
१८. ए. बी. कीथ, उक्त, पा० ३१६–३१७.
१९. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, ऋग्वेदाचे मराठी भाषांतर, पा० ६९०.
२०. तैत्तिरीय संहिता, ६-१·६; महाभारत, १·२०–२३.
२१. देवीप्रसाद चट्टोपाध्याय, उक्त, पा० २९२–२९३.
२२. उक्त, पा० २९३.
२३. तैत्तिरीय संहिता, १-५-४-१; ७·३-१-३.
२४. ए. बी. कीथ, ऋग्वेद ब्राह्मणाज, एच्० ओ० एस०, खंड २५, पा० २४८.
२५. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २३, पा० ४५१.
२६. देवीप्रसाद चट्टोपाध्याय, उक्त, पा० २९४.
२७. जातक ( हिंदी ), खंड २, पा० ७२–७३.
२८. उक्त, पा० ४५-४६; खंड ३, पा० १९३–१९५.
२९. श्रीधरशास्त्री पाठक, उक्त, पा० १९७.
३०. पां० वा० काणे, हिस्टरी ऑफ धर्मशास्त्राज, खंड २, भाग १, पा० १५५–१५६.
३१. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड १३, पा० १७६–१७७.

३२. उक्त, खंड ४३, पा० ३६६–३६७.

३३. महाभारत; १·६६-१–३; भागवत, ६-६; १७–१८.

३४. महाभारत; १.९६.१००, १-६६·१७–१८; भागवत, ६·६-१०–११.

३५. आपटेज संस्कृत–इंग्गिश डिक्शनरी. आदित्य.

३६. उक्त, विश्व.

३७. महाभारत; १३.९१.३०–३७.

३८. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २, पा० ८५ २८६; खंड १४, पा० ११७–११८, २१५.

३९. पां० वा० काणे, उक्त, दा० २१७–२१८.

४०. जॉर्ज थॉमसन, स्टडीज इन एन्शंट ग्रीक सोसायटी, खंड १, पा० २२९–२३०.

४१. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ११, पा० ९३–९४.

४२. लक्ष्मण सरूप, उक्त, पा० २६.

४३. उक्त, पा० ८१.

४४. उक्त, पा० १८८.

४५. पी. सी. राय, द महाभारत, खंड १, पा० ३५६.

४६. उक्त, पा० ३५५–३५६

४७. रॉबर्ट ब्रिफॉल्ड, उक्त. खंड ३, पा० १९८–१९९.

४८. उक्त, २१९–२३०.

४९. उक्त, पा० २२०.

५०. उक्त, पा० २००.

५१. पद्मनाभ मेनन, हिस्टरी ऑफ केरल, खंड २, पा० ८२–८३.

५२. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, उक्त, खंड १, पा० ६४९, ६६६.

५३. जातक ( हिंदी ), खंड ५, पा० ३६१–३६२.

५४. जगदीश काश्यप ( सं० ); मज्झिमनिकायपालि, १-३८-३-१३; २-४३-२-१०.

५५. जगदीश काश्यप ( सं० ), अङ्गुत्तरनिकायपालि, ५-१५ -३.

५६. पद्नाभ मेनन, उक्त, खंड, १, पा० ५३५–५३६, खंड २, पा० ८.

५७. शबर भाष्य, अनु० गंगानाथ झा, खंड १, पा० ४.

५८. जॉर्ज थॉमसन, रिलिजन, पा० ९.

५९. जातक ( हिंदी ), खंड १, पा० ४७२–४७५.

६०. दा० ध० कोसंबी, मिथ अँड रिॲलिटी, पा० ५५.

६१. उक्त, पा० ५४–५५.
६२. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, ऋग्वेदाचे मराठी भाषांतर, पा० ६८१.
६३. वाजसनेयि संहिता, २३.१८–३२; तैत्तिरीय संहिता, ७.४-१९.
६४. देवीप्रसाद चट्टोपाध्याय, उक्त, पा० ४०६.
६५. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड १४, पा० २३३,१३३.
६६. महाभारत, १-६३:७८; १·१०४:१३; ३-३०७-२५.
६७. पद्मनाभ मेनन, उक्त, खंड १, पा० ९९–१००; ओ० आर० एहरेनफेल्स, मदर राइट इन इंडिया, पा० ६६.
६८. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, उक्त, खंड २, पा० ४१३–४१४.
६९. उक्त, पा० ४४३–४४५.
७०. महाभारत, १-८२-९,१३.
७१. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड १७, पा० १७९–१८०
७२. जगदीश काश्यप ( सं० ), विनयपिटक, महवग्गपालि, ८-२-६.
७३. ओ० आर० एहरेनफेल्स, उक्त, पा० ६२–६३.
७४. नैषधचरित. ३·२१; रघुवंश, ८-६३; मालविका–अग्निमित्र, अंक ३.
७५. ए० बी० कीथ, उक्त, पा० १२०.
७६. उक्त, पा० २०; खंड १९, पा० ४०७–४०८; द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ४१, पा० ३२०.
७७. उक्त, खंड २३, पा० १४२.
७८, जगदीश काश्यप ( सं० ), दीघनिकायपालि, पाथिकवग्ग, ४.३-१५.
७९. पद्मनाभ मेनन, उक्त, खंड २, पा० १४–१५.
८०. ओ० आर० एहरेनफेल्स, उक्त पा० ५३.
८१. ई० एम० एस० नंबूदिरीपाद, केरल: यस्टर्डे टुडे अँड टुमॉरो,
८२. पी. आर० टी० गुर्डीन, द खासीज, पा० ३३–३४.
८३. हिस्टरी ऑफ फिलॉसॉफी : ईस्टर्न अँड वेस्टर्न, खंड १, पा० ३२.
८४. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ४३, पा० १७१.
८५. देवीप्रसाद चट्टोपाध्याय, १ उक्त, पा० २९४–२९६.
८६. डब्लू० रॉबर्टसन स्मिथ, उक्त, पा० ४२.
८७. डब्ल्यू० डी० व्हिटने अथर्ववेद संहिता, पा० ६६३.
८८. डब्ल्यू० रॉबर्टसन स्मिथ, उक्त, पा० २०७–२०८.
८९. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, उक्त, खंड ३, पा० ८०–८१.
९०. उक्त, पा० ७९.

९१. पद्मनाभ मेनन, उक्त, खंड १, पा० २५४–२५५.
९२. तैत्तिरीय संहिता, ६·१-६-१.
९३. अमरकोष, ४३९.
९४. जे० जी० फरेझर, द स्केपगोट, पा० ३०२–३०४.
९५. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २४, पा० १२८,३२८–३२९.
९६. जातकपालि, २२-५४६: १३५६;१३५९.
९७. ओ० आर० एह्‌रेनफेल्स, उक्त, पा० ६१.
९८. उक्त, पा० ६६.
९९. पद्मनाभ मेनन, उक्त, खंड १, पा० ८८–८९.
१००. आर० ग्रिफिथ, ह्मिस ऑफ द ऋग्वेद; खंड २, पा० ५५७.
१०१. ऐतरेय ब्राह्मण, ७·१६,
१०२. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, ऋग्वेदाचे मराठी भाषांतर पा० २१.
१०३. उक्त.
१०४. दा० ध० कोसंबी, कल्चर अँड सिव्हिलायझेशन ऑफ एन्शंट इंडिया इन हिस्टॉरिकल आउटलाइन, पा० ८०
१०५. वेदिक इंडेक्स, खंड २, पा० ९७.
१०६. ए० बी० कीथ, उक्त, पा० ११३–११४.
१०७. तैत्तिरीय संहिता, ७-१४-१९; वाजसनेयि संहिता, २३-१८.
१०८. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, उक्त, खंड ३, पा० १४८.
१०९. उक्त, पा० पा० ८०–८१.
११०. जॉर्ज थॉमसन, स्टडीज इन एन्शंट ग्रीक सोसायटी, खंड १. पा० ३३९.
१११. आर० ग्रिफिथ, उक्त, खंड २, पा० ५५८.
११२. दा०ध०कोसंबी, ॲन इन्ट्रॉडक्शन टु द स्टडी ऑफ इंडियन हिस्टरी,पा०६०.
११३. तैत्तिरीय संहिता, ४-२-६-२; वाजसनेयि संहिता, १२-७९; ऋग्वेद, १०·९७-५
११४. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, ऋग्वेदाचे मराठी भाषांतर पा० ३९.
११५. लक्ष्मण सरूप, उक्त, पा० १६१.
११६. आर० ई० ह्यूम, द थर्टीन प्रिन्सिपल उपनिषद्स, पा० ४०३.

डॉ० सुरेश म० डोळके

# श्रीचक्रधरनिरूपित (?) 'संपूर्ण' श्रीकृष्णचरित्र : २ :

## [ संहिता : लेखांक १ ]

### प्रास्ताविक

मागील लेखात सांगितल्याप्रमाणे या लेखापासून श्रीचक्रधरनिरूपित (?) 'संपूर्ण' श्रीकृष्णचरित्रातील अद्याप प्रसिद्ध न झालेली संहिता प्रसिद्ध करीत आहे.

'अक्रूरस्वामीद्रोहीकथनी सत्राजीतवध–कथन' ही प्रसिद्ध झालेल्या श्रीकृष्णचरित्राची शेवटली लीळा. प्रस्तुत पोथीत 'अक्रूरस्वामीद्रोहीकथनी सत्राजीतवध–कथन' ही लीळा संपल्याबरोबर लगेच, त्याच पानावर (पोथी–पृ. १५७), त्याच ओळीत, 'दूर्योधनदर्पहरण–कथन' ही पुढली लीळा लिहायला प्रारंभ झालेला आहे.

या संहिता–लेखमालेच्या रूपाने वाइंदेशकरपाठाच्या 'संपूर्ण' श्रीकृष्णचरित्राची 'अक्रूरस्वामीद्रोहीकथनी सत्राजीतवध–कथन' या लीळेनंतरची संहिता प्रथमच प्रकाशित होत आहे.

### दूर्योधनदर्पहरण–कथन :॥ ॥

एकु दी : भक्ती पुसिलें : "जी जी : हे पूराणीक दूर्योधनाचा बहूत पुरुषार्थ वाणीताति : हे साच जी ?" : सर्वज्ञें म्हणितलें : "आति : परि पांडवासि न पूरे : अेरा कव्हणाते तो न मानी : एकु वेळ तयाचा दर्पु बळिभद्रीं हरीला" : भक्ती पुसिलें : 'जी जी : कैसा हरीला ?' : सर्वज्ञें म्हणितलें : "लाखाजोहरी पांडव घातले : मा दूर्योधन अवघें राज्य करू लागला : मग दूर्योधनें आपूलीये कन्येचें सैंवर आरंभीलें : तीये नाव लक्ष्मणा : तेथ समस्त पृथवीचे राजे मीळाले : तेथ जांबूवंतीपूत्र शांबुर गेला : मा सैंवरीहूनि बळेंचि कन्या हरीली :

अनुक्रमणिका



रथावरि घालूणि द्वारकेचीया वाटा चालला : मग : कर्णमूख्य समस्त कौरव पाठी लागले : भीष्मद्रोण हे दोघचि तेथ नव्हते : शांबरें कर्ण पराभवीला : अवघे कौरव पराभवीले : मा अवघे अेकें वेळें शांबरावरि चालीले : मग वेढूणि शांबरातें धरीलें : शांखळा घालूणि बंदीश्याळेसि घातला : ते नारदें ऊग्रसेनमुख्य समस्ता यादवा जाणवीलें : मग बळिभद्र : उद्धवदेव : शांबरातें सोडावया नीगाले : ते हस्तिनापूरासि आले : दूर्योधनासि भेटले : दूर्योधन तयासि आदर न करीचि : बळिभद्र : उद्धवं : ऊभेचि होते : मग उद्धवीं भणितलें : "राजेहो तूम्हासि ऊग्रसेनेंराये अैसी आज्ञा पाठवीली असे : 'जे शांबूबाळक तयावरि तूम्ही येसना आवेश केला : तरि : बरवें केलें : परि : आता सोडुनि पाठवीजे : ना तरि आपूला ठाइ सावध असीजे" : तंवं दूर्योधनें भणितलें : 'पाहाहो पायीची वाहान पायीचि : ते मस्तकी ठेऊनि काइ चालो अेईल ? : हे यादव यासि छेत्रसींहासन नाही : ये आपराजे : आम्हा रायासि याची आज्ञा : आन आम्हासि आपूलीया पुरुषार्थाचें भय सांघनें !' : बळिभद्रीं दूर्योधनासि बहूत सौम्य ऊपचारें भणितलें : 'पां पूत्र सोडा' : ते तो मानीचिना : मग बळिभद्रीं कोपौणि भणितलें : 'मी बळभद्र आताचि नी:कौरवी पृथवी करीण' : भणौनि तेथौनि ऊठौणि उद्धवेंसी नगराबाहीरि नीगाले : आनि नगरासि नागर घातला : आन अवघें नगराचे ढीवल ऊचडलें : ते कानवडें केलें : गंगेमाजी बुंचं घालावें तंवं दूर्योधन सकूटंबी शरण आला : शांबू– लक्ष्मणेंसहीत पुढा त्यामागें दूर्योधन : त्यामागें अवघे कौरव : मग दूर्योधन कौरवासहीत साष्टांग आड पडीला : मग बळिभद्रांचा क्रोध गेला : नागर काढीला : मग दूर्योधनें बळिभद्रातें : उद्धवातें : नगरांत नेलें : शांबा–लक्ष्मणा लग्ण लावीलें : मग च्यारि दीवस सोहळा जाला : मग शांबातें घेऊनि बळिभद्र : उद्धंवदेव : लक्ष्मणासहीत द्वारकेसि आले : मग यादवा हर्ष जाला : शांबा– लक्ष्मणेंसी शेषपाटु भरीला : अैसे ते हस्तीनापूर अद्यापि कानवडें असे" :।।७०।।

ऋक्मीयावध-कथन :।। ।।

एकु दी : भक्ती पुसिलें : "जी जी : ऋक्मीया बळिभद्रीं वधीला अैसें पौराणीक बोलताति : हें साच जी ?" : सर्वज्ञें म्हणितलें : 'आति : श्रीकृष्णचक्रवर्त्ति ऋक्मीयाची कन्या प्रद्यूम्णासि केली : तीये वऱ्हाडीके जाली : श्रीकृष्णचक्रवर्त्ति मूख्ययादवासहीत कौंडन्यपूरासि बीजें केलें : च्यारि दीवस सोहळा जाला : मग : अेक दीवसीं दंत्तवक्र ऋक्मीयासी सारीपाट खेळत होता : तेथ बळभद्र गेले : ते सूरापाणें ऊन्मत्त जाले होते : भणौनि दंत्तवक्र ऋक्मीया बळभद्रासि रळीया करू लागला : बळिभद्रां कोपु आला : तो ऋक्मीया मूसळें

हानौंणि वधीला : मुष्टीघातें दंत्तवक्राचे दांत पाडीले : तंवं हाहाकारु जाला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ आले : मग भणितलें : ' दादो हे काइ केलें ' : मग तया अवघेयातें संबोखूणि : श्रीकृष्णचक्रवर्त्ति द्वारकेसि बीजें केलें " :॥७१॥

लाखागृही पांडववीमोचनी राज्यालंब–कथन :॥ ॥

एकु दी : महदाइसी पुसिलें : " जी जी : श्रीकृष्णचक्रवर्त्ति लाखाजोहरी पांडव कैसे रक्षीले ? " : सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : भीष्में धृतराष्टरें युधीष्ठीरासि राज्यपट्ट दीधला : तेनें दूर्योधन पांडवाचा द्वेष करी : पांडवातें वधावेया नाना ऊपाये केले : परि तयाचें काही केलेंया न वचेचि ! : असें पांडवी हस्तीनापूरी दोनिशत वर्षें :॥ २०० ॥ राज्य केलें : एकु दी दूर्योधनें शकूनीयाचेनि मंत्रें धृतराष्टरातें भणितलें : ' वारुणावत नगर बरवें : तेथ पांडव असतील : अेथ असता या आम्हा न पडे ' : मग धृतराष्टरें युधीष्ठारातें पाचारूणि भणितलें : ' तूम्ही वारुणावती राहावें : तेथौनि अवघें राज्य चालवावें : हे माझे पूत्र दृष्ट असति : तूमचा द्वेष करीताति ' : तें युधीष्ठीरें मानीलें : मग : पांडव वारुणावतासि नीगाले : तंवं दूर्योधन पूरोचन ब्राह्मण पूढा पाठऊनि बरवें लाखेचें पौळी–पागारें राजमंदीरें करवीली : तेणें केली : तंवं पांडवासि वारुणावता अेता सा मास लागले : मार्गी देशीचें माहाजन मानीये मंडळीक राहावीति : म्हणौनि मग पांडव वारुणावता जाऊनि दूर्गामाजी लाखारगृही प्रवेशले : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्ति वीस्वकर्मा बोलाऊनि तयासि गूप्त वीवर करावयाची आज्ञा केली : मग तेनें आपूला दूत रणकु पाठवीला : तेनें दीढा गाऊवाचेनि मानें गूप्त वीवर केलें : ते श्रीकृष्णचक्रवर्त्ति वीदूरकरवी पांडवा जानवीलें : मग : फालगूणमासी पांडवी श्राद्ध केलें : तीये दीवसी भील्लाचा राजा नीषाद : तयाची स्त्री पाचा पूत्रासहीत पांडवा भेटो आली : तीयेसि चीत्रशाळेसि बीढार दीधले : फालगूणसूद्ध चतूर्दसी मध्यान्हेअेकी रात्री अवघी नीजैली असति : पूरोचन नीजैला असे : आन भीमसेनें ऊठौनि दारवंठा आगि लावीली : अग्णी प्रजळला : आनि भीमसेनें वीवरद्वारीची शीळा ऊघडीली : मग तेनें वीवरें कूंतीयेसहीत पाचही पांडव नीगाले : अेरीकडे अवघे कौरव ऊदयाचि वारुणावतासि आले : पाहाताति तंवं साहीजनें आन पूरोचन जळाला असे : पांडव भणौनि तयाची ऊर्द्धक्रीया केली : मग : पांडव दक्षीण दीसे नीगाले : तेथ भीमसेनें हींडंबा राक्षेस वधीला : त्याची बहीनी हीडंबा प्रणीली : तेथ भीमसेनापासौनि हींडंबेचा ठाइ घटोत्कच जन्मला : तेथ पांडवासि व्यास भेटला : मग पांडव अेकचक्रासि आले : तेथ भीमसेनें बकु राक्षेस मारीला : तेथौनि पांडव नीगाले : मार्गी व्यास भेटला : तेनें

द्रौपदीसंवरासि पाठवीलें : तंवं मार्गी अर्जूना गंद्धर्वासी यूध्य जालें : अर्जूनें गंद्धर्वें अग्नीबाणें(णी) त्रासीलें : मग ते अर्जूना शरण आले : अर्जूना चाक्षुसी वीद्या दीधली : धौम्य पूरोहीत दीधला : अर्जूनापासूनि अग्णीवीद्या घेतली : मग पांडव पांचाळासि आले : तेथ अर्जूनें अवघेंया रायादेंखता लक्ष्य भेदूनि द्रौपदी हरीली : भीमार्जूनें सकळ राजे पराभवीले : तेथ श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि पांडव भेटले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति पांडावाकूंतीयेतें अस्वासीलें : मग पाचा पांडवा द्रौपदीसि लग्ण लागलें : तदनंतरें : कौरव पांडवावरि चालीले : मग पांडवी कौरव पराभवीले : मग भीष्में सीष्टाइलागी वीदूर पाठऊनि पांडवा अर्द्ध राज्य दीधलें : राजधानीसी इंद्रप्रस्त दीधलें : मग : भीष्ममूख्य अवघे कौरव पांडवा भेटले : अवघेया साम्य जालें : मग : श्रीकृष्णचक्रवर्ति वीस्वकर्मा बोलाऊनि इंद्रप्रस्त स्वर्गासमान करवीलें : तेनें अवघी कनकरत्णमये वीचीत्र अन्येकवीध रचना केली : मगः श्रीकृष्णचक्रवर्त्तिसहीत पांडव इंद्रप्रस्ता प्रवेशले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति यूधीष्ठीर सिंहासनी बैसवीला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति यादवासहीत द्वारकेसि बीजें केलें " : ॥ ७२ ॥

## अभीमन्याभूजाछेदु-कथन : ॥ ॥

एकु दी : भवती पुसिलें : "जी जी : हा अभिमन्यू सासार्जूनाचा अवतार ऐसें बोलताति : हे साच जी ? " : सर्वज्ञें म्हणितलें : " अभीमन्य सासार्जून होअे : परि अवतार नव्हे ::: जीवें जे होआवें तेचि होअे : देवता हो जाने : ऊरो जाने : पूरो जाने :।१।: सहस्रार्जून तो जीव : देवता नव्हे " : भवती भणितलें : " जी जी : हे अभीमन्याची कथा नीरोपावी जी : " सर्वज्ञें म्हणितलें : " पांडवासि इंद्रप्रस्ती राज्य करीता कव्हणी अेकी दीवसी तीये नगरी रात्री खाण पडीलें : भणौनि अर्जून शस्त्रालागी चीत्रश्याळे प्रवेशला : तंवं तेथ यूधीष्ठीरद्रौपदी नीजैली होती : अर्जूनें शस्त्रें घेतली : चोर वारीले : यूधीष्ठीरद्रौपदी शयनी देखीले भणौनि प्रायश्चीतालागी अर्जून तीर्थयात्रेसि नीगाला : अवघी तीर्थें केली : तीर्थें करीता ऊलपी प्रणीली : तीयेचा ठाइ अेक पूत्र जाला : मग चीत्रांगदा प्रणीली : तीयेचा ठाइ बब्रुवाहान जाला : मग : द्वारकेसि आला : तेथ श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि भेटला : एकु वेळ सूभद्रेतें देखौणि अर्जूनादेवाचें मन वीकरलें : ते श्रीकृष्णचक्रवर्त्ति जानौणि हास्य केलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'अर्जूनहो हे तूम्ही यात्राकाळी हरावी' : अैसा सीद्ध केला : मग बळभद्रमूख्य समस्त यादव मांहेंद्र पर्वता यात्रे नीगाले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति द्वारकेसि राहीले : मग : श्रीकृष्णचक्रवर्त्ति सूभद्रेतें भणितलें : 'तूवा अर्जूना माळ घालावी' :

सूभद्रा भणितलें : ‘मी याते कैसे वोळखावे ? ’ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूना–सूभद्रेसी सौरसु केला : मग सूभद्रा माहेंद्रासि नीगाली : मार्गी जाता अर्जूनी बळात्कारें सैन्यातें वधूनि हरूणि रथी वाइली : आन घेऊनि नीगाले : तंव बळभद्रमूख्ययादवासमस्ता ठाऊकें जालें : ते अर्जूनी त्यावरि मोहनी घातली : तेनें ते नीजले आपण घेऊनि गेले : मागा श्रीकृष्णचक्रवर्त्ति अेऊनि यादवाची मोहनी काढीली : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘तूम्ही असने वीर असता अेके भगवेनि सूभद्रा नेली : ” मग बळभद्र श्रीकृष्णचक्रवर्त्ति संवादौनि यादवासहीत इंद्रप्रस्तासि आले : तेथ अर्जूना सूभद्रेसी लग्ण लावीले : मग : बळभद्रमूख्य समस्त यादव द्वारकेसि पाठवीले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति इंद्रप्रस्थी राहीले : मग : द्रौपदीसी पाचा पांडवापासूनि पाच पूत्र जाले : अर्जूनापासूनि सूभद्रेचा ठाइ गर्भासि सहस्रार्जून आला : तयासि ऊपरी सहस्र भूजा : सूभद्रेसि नव मास भरले : मग अेकी रात्री सूभद्रा श्रीकृष्णचक्रर्त्तीसि चक्रवीहुरीगावा पुसिलां : श्रीकृष्णचक्रवर्त्ति नीरोपीला : तंवं सूभद्रेसि नीद्रा आली : अभीमन्ये ऊदरांतूणि हुहुकार देत असे : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति वीचारीलें : ‘ सहस्रबाहूबाळजन्मता इयसि कष्ट होंतील : ’ भणौनि तीयेचीये ऊदरांत सूदर्शन संचरूणि भूजा छेदीलीया : दोनि राखौणि वीकटबाहो केला : तीया भूजा आगोचरा केलीया : तंवं अभिमन्य व्याकूळ जाला : मग ऊपजला : मग समस्ता पांडवा महोत्साह जाला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति द्वारकेसि बीजें केलें ” : ।। ७३ ।।

दांगवी-कथा-नीरोपण : ।। ।।

एकु दी : भक्ती पुसिलें : “ जी जी : दांगवी-कथा कैसी ते सांघावी ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ एकु वेळ दूर्वासयासि तप करीता वीशअेवासना ऊपजली : मग तेणें स्वर्गासि जाऊनि इंद्रासि अेक अपसरा मागीतली : इंद्रेंऊ वंशी धाडीली : ऊर्वंशीया दूर्वासयाचें वीभछ रूप देखौणि अनादर केला : मग तेणें भणितलें : ‘ तूज अध:पात होइल : दीवसा घोडी रात्री मानूस होसी ’ : अैसा श्याप दीधला : ऊर्वंशीया भणितलें : ‘ ऊपश्याप कीजो ’ : दूर्वासेनि भणितलें : ‘ आऊठ वज्रे अेकवट होती तैं तूज ऊपश्याप होइल ’ : मग : ऊर्वंशी मृत्यलोकी दांगवी रायाचीया घरा गेली : मग तो तीयेसि वीचरे : हा वृत्तांत नारदें श्रीकृष्ण-चक्रवर्त्तिपूढा सांघीतला : मग दांगवीसि ते घोडी मागो पाठवीली : घोडी दयावी का पळावें : तंवं पळावें का कव्हणी सदर्थाची पाठि रीगावी : दांगवी भणितलें : ‘ प्राण जाइल : परि हे न देववे ’ : मग दांगवी आपूलें राज्य सांडौणि

घोडीसी पळाला : बहूत रा[ज*]धानी [१] हींडौन्नला : परि तयासि कव्हणी रावो पाठीसी न घालीचि ! : मग तो इंद्रप्रस्थासि आला : तेथ गंगातीरी घोडीये-सहीत अग्णीकाष्ठें खावो आदरीली : ते सूभद्रा देखौणि त्यातें पुसिलें : तेणें सांघीतलें : तो सूभद्रा पाठीसी घातला : आपणया भीमसेनु सहायी केला : भीमसेनें दांगवीसि नाभीकारु दीधला: ते आइकौणि श्रीकृष्णचक्रवर्त्ति यादवासहीत पांडवावरि चालि केली : ते काळी पांडव-कौरव अेकीकडे जाले : दोन्ही अरणी ऊन्मता जालीया : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति सूदर्शन पांडवावरि मोकलीलें : त्यातें नीवारावया भीमसेनें गदा घातली : दोन्ही वज्रें भीडो लागली : तेणें दोही दळा आटभवें : मग अर्जूनी ते नीवारावया हनूमंतदेव पाठवीले : हनूमंतदेवासी दोन्ही वज्रें भीडो लागली : अैसां तीही वज्राचेंनि दोही दळा आठभवे : मग भीमसेनें तीन्ही वज्रें धरीली : भीमसेन तो नाभीकारीणि वरौता अर्द्धवज्रः अैसी आऊठ वज्रें मीळाली : आनि ऊर्वशी ऊपश्यापातें पावौणि अवघेयांदेखता गगनमार्गे स्वर्गासि गेली : इतूकेनि येन्हायेन्हाचें यूध्य पारुखलें : यादवा-पांडवा सांम्य जाले : दांगवी आपूलीया नगरासि गेला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति यादवासहीत द्वारकेसि बीजें केलें " :॥७४॥

क्षीराब्धि श्रीकृष्णार्जून-गमन-कथन :॥ ॥

हे कथा : सर्वज्ञ दो ठाइ नीरोपीली : बाइसें एकाधा वेळ अैसा आग्रहो घेति जो लोटेना : एकु दी बाइसें मात्रकौळीयेचा मार्गी आग्रहो केला : तेथ ऊपाध्याप्रती हे कथा सांघीतली : तथा बाइसी [२] जेऊरमार्गी आग्रहो केला : तेथ हे कथा ऊपाध्याप्रती सांघीतली : आनि बाइसी जीवधर्म : देवताधर्म पुसिलें : तया प्रकरणावरि सर्वज्ञ जीवधर्म देवताधर्माचा नीर्वच केला : मगः स्त्रीत्वाचा नीर्वच करीता सर्वज्ञें म्हणितलें : "स्त्रीयेचा स्वरूपी आग्रहो अेकु आति : तया स्त्रीयाचा ठाइ आग्रहो एकु आति " :।१।:

महदाइसी भणितलें : "जी जी : तो कैसा ?" : यावरि सर्वज्ञ ऊपपत्ती-लागी हे कथा नीरोपीली : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : क्षीराब्धिची देवता आपूला शयनी वीश्रामली होती : लक्ष्मी पाये तळहातीत होती : तंवं शेषसाया

---

१. 'राधानी' एवढेच मूळात आहे. 'राजधानी' यातील 'ज' येथे गळला असावा. तो मी चौकोनी कंसात * अशा खुणेसहित योजला आहे [*] ही खूण गळलेला वाटणारा वर्ण किंवा शब्द मी योजल्याची आहे.

२. हे संकेताक्षर खाडाखोडीने इतके गिचमिड झालेले आहे की ते स्पष्टपणे वाचता येत नाही.

श्रीकृष्णचक्रवर्त्तिची केळीक्रीडा अंतरें लक्षोनि नीश्चळ होता : लक्ष्मी पाये तळहातीले : मग ते हात जोडुणि पूढा ऊभी राहीली : मग सेससायीया ऊठौणि गरूडासनी बैसौनि ध्यानस्थ जाला : अंतरें श्रीकृष्णचक्रवर्त्तिची केळीक्रीडा लक्षी लागला : श्रीकृष्णचक्रवर्त्तिचीया अगाधा लीळा देखौणि अनूपम्य सौंदर्य देखौणि माथा तूकीला : तथा मुकुट तूकीला : मग ध्यान वीसर्जलेंयानंतरें लक्ष्मीया पुसिलें : 'हे काइ जी : सर्वज्ञ मूकुट का तूकीला' : सेषसायी ऊगाचि : लक्ष्मीया भणितलें : 'सर्वज्ञ काइ माझी भक्ति देखौणि संतोषले ? : की काही आश्चर्य देखीलें ? : अैसें सर्वज्ञ मज सांघावें' : सेषसाये भणितलें : 'हे सांघो नये' : त्या भणितलें : 'हे सांघावेंचि' : भणौनि आग्रहो केला : मग सेखसाये भणितलें : 'भूमंडळी मृत्यलोकी : द्वारकी : श्रीकृष्णचक्रवर्त्ति अवतरले असति : ते साक्षात् परब्रह्म : तयाचें लावण्यसौंदर्य देखौणि मीया माथा तूकीला' : तीया भणितलें : 'तरि ते काइ तूम्हापसि बरवे ?' : शेषसाये भणितलें : 'मृत्यलोकी वीस्मो : नाना कंदर्पकोटी पृथवीमध्ये वोवाळुनि सांडीजेति : अैसेया अवतरलेंया श्रीकृष्णाचें बरवेपण : तयाचेंया श्रीचरणाचा आंगोठा : तेयीचीया नखाग्रीचे बरव : तया नखाचियाइतूकें आमचा ठाइ बरवेपण नाही : आनि काइ : तयासि आनि मजसी केऊता पाडु' : भणौनि सहस्त्रमूखी श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति वर्णन केलें : तेणें लक्ष्मीयेसि श्रीकृष्णचक्रवर्त्तिचा वेध ऊपजला : शेषसाये भणितलें : 'श्रीकृष्णांते वर्णावया मज कैंची मती ?' : भणौनि ऊगाचि राहीला : मग लक्ष्मीया भणितलें : 'ऐसे बरवे ते मज दाखवावे : तरि ते मीया देखावे : आनि काइ' : भणौनि अैसा आग्रहो घेतला : तेव्हेळी सेशसाये श्रीकृष्णचक्रवर्त्तिची सहस्त्रमूखें अभ्यर्थना केली : परि श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथ बीजें न करीतीचि ! : मग सेखसायीयासि साकडें पडीलें : मग : द्वारावती-येचीया ब्राह्मणाची बाळकें नेवो आदरीली : तया नाव सत्यभामु : तेव्हेळि द्वारवतीयेचीया ब्राह्मणाची लेकुरुवें नेवो लागला : ब्राह्मणीसि प्रसूति होओ : लेकुरु ऊपजे : आनि मरे : तेनें क्षीराब्धि नेइजे : अेक बाळक ते साता दीवसाचें नेले : अैसी सात बाळकें नेली : तथा दाहा : साहावेंया लेकुरुवाचिये वेळे तेथ अर्जूनदेव श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि भेटो आले होते : ते तेथ राहीले होते : शेषसायीये तया ब्राह्मणाची सा लेकूरुवें नेली : तेनेंसी थोर दूःख जालें : मग तेणें धर्मश्यास्त्री पाहीलें : तंवं तेथ अैसें नीगाले : 'राजा अधर्म करी तरि प्रजा वाढेना : का आपण अधर्म कीजे तरि सप्त जन्में संतति क्षयातें पावे' : मग तो ब्राह्मण साहावीया लेकुरुवाचेंया वेळी माहाद्वारसि बोंबलीति हाका देत रडतेंचि आला : मग राजमाहाद्वारी ऊभा ठाकौणि तीन वेळ बोंबलीला : आन बोलीला :

अनुक्रमणिका

‘आगा ये लोकें हो : हे राजे अधर्मशीळ : याचा ठाइ अधर्म वर्त्तत असैल : का याचा राऊळी अधर्मु वर्त्तत असैल : भणौनि माझी प्रजा वाढेना : मी तरि काही अधर्म करीत नाही ’ : तंवं त्यासि कव्हणीचि न बोले : ब्राह्मणें भणितलें : ‘आरे आरे आरे राजेहो : तूम्ही राजे अधर्मवंत : भणौनि माझी प्रजा पाळेना : मी तरि काही अधर्मु नाचरे :’ अैसें भणौनि दूःख करूणि हंबरडा हाने : परि तयासि कव्हणीचि प्रत्यूत्तर नेदीचि ! : अैसा तो सात दीवस माहाद्वारी येऊनि वीळापु करी : परि तयातें कव्हणीचि सांभाळीना ! : मग तो तमला : राज-माहाद्वारी येऊनि बोलीला : ‘ आगाये हे लोकहो अवघें नगर आनंदभरीत असे : आन माझीचि बाळकें का नेइजताति : मजचि पूत्राचें दूःख ते काइसें : हा दूराचारी श्रीकृस्ण : याचा ठाइ अतीत अनागत वर्त्तमान अैसें त्रीकाळज्ञान वर्त्ते : मा हा माझेया गर्भाचें दूःख काइ नेने ? : आता मी यातें श्यापीन ’ : भणौनि हाती ऊदक घेतलें : मोटकाचि श्यापु दयावा तंवं पैलाकडुणि अर्जून बीहाळीअेलागी नीगाले : ते तो शब्द आइकौणि धांवंत माहाद्वारासि आले : मग अर्जूनी भणितलें : ‘आगा ब्राह्मणा : का बोबातासि ? ’ : तंवं तो बोलेना : मार्गौतें अर्जूनी भणितलें : ‘हे काइ नाइकोन बोला कैसे : कवणातें श्यापीत असा ? : तूम्हा कवणें गांजीलें ते सांघा ’ : तेणें भणितलें : ‘ तू कवण : कोठील : तू काइ बळंभद्र : की श्रीकृष्ण : की प्रद्यूम्ण : तू का पूसतासि : हा बळभद्र पूसेना : हा श्रीकृष्ण पूसे ना : हा प्रद्यूम्ण पूसे न : तया हा राम-कृष्ण न पूसे : मा तू काइ पूसतासि : हा श्रीकृष्ण पूसैल तेव्हळि श्रीकृष्णा-पुढें सांघेन ’ : अर्जूनें [ भणितलें ]* : ‘जोचि श्रीकृष्ण तोचि मी : मजपूढा सांघा ’ : ब्राह्मणें भणितलें : ‘ मा तूजपूढा सांघीतलेंया तूझेनि काइ होइल ? ’ : अर्जूनी भणितलें : मी बळभद्र नव्हे : मी श्रीकृष्ण नव्हे : मी प्रद्यूम्ण नव्हे : मी गांजीवधनूष्या अर्जूनु : जयाचें गांजीव धनूष्य वाखाने : तो मी पूसताये ’ : तेव्हळि तेणें ब्राह्मणें आपूली अवघी व्यवस्था सांघीतली : ‘आगा अर्जूना हे अवघें नगर प्राप्त (?) ‘ भरीत असे : आन माझीचि बाळकें मरताति : ये नगरी अधर्मुवर्त्त असे ’ : अर्जूनें भणितलें : ‘ तूमची बाळकें अेथौनि जीये ऊपजती तीये मी राखैन ’ : ब्राह्मणें भणितलें : ‘ तू काइ राखसी ! ’ : ‘ ना मी राखैन ’ : ‘ तू राखसी ? ’ : ‘हो मी राखैन’ : ब्राह्मणें [भणितलें]* : ’ ‘न राखसी तरि काइ ? :’ अर्जूनें भणितलें : ‘ न राखवती तरि मी अग्णीप्रवेश करीण : तथा काष्टें खाइन ’ : अैसी प्रतीज्ञा घेतली : ब्राह्मणें भणितलें : ‘ प्रसूति होअेतंवंवेन्ही तू कवणीये ठाइ अससी ? ’ : अर्जूनी भणितलें : ‘ तंवंवेन्ही मी अेथचि असैन : प्रसूति होतीयेसमयी मजपूढा सांघावें ’ : ‘ हो का ’ भणौनि ब्राह्मणु घरासि

गेला : नीच तो ब्राह्मणु घरासि दू खेंसी ये : तीये दीवसी हर्षें हासत हासत आपूलीया घरा गेला : प्रत्येही दुःखीत असे : ते संतोषी देखौणि तयाचीया ब्राह्मणी पुसिलें : 'सा लेकुरुवें सरली : आजि तूम्ही अैसे संतोषी काइ : आजीचि लेकरु सरलें : तूम्ही अैसे हासता काइ : येवढा हर्ष काइसा ' : ब्राह्मणें भणितलें : " अर्जून म्हंणत असे : 'अेथौणि जीये बाळकें ऊपजती तीये राखैन : नाहीतरि अग्णीप्रवेश करीण ' : " अैसें आइकौणि तेव्हेळी तेही हर्षातें पावली : प्रसूति होतासमयी अर्जूनातें बोलाऊ गेला: बोलावीले : अर्जून आले : अर्जूनी त्याचेया आवारासि शरपंजरु केला : शस्त्रास्त्री घर पंजरीलें : बाणी बाण लाऊनि आपण द्वारी ऊभा राहीला : तंवं तीये वेळे ऊपजतक्षेणीचि लेकुरु अदृश्य जालें : तथा लेकुरु देवता वरिचियावरि नेलें : तथा ऊदरांतूनिचि नेलें : तैसाचि तो ब्राह्मण नीगाला : द्वारासि अर्जूनाजवळि आला : अर्जूनावरि आवेशौणि बोलीला : ' मर मर अर्जूनाः अेनें अर्जूनपणेंसी : जळो तूझें अर्जूनपण : जळो तूझी प्रतीज्ञा : जळो तूझें गांजीव धनूष्य : काइ धनूष्यबाण घेऊनि ऊभा राहीलासि ' : अर्जूनी भणितलें : ' काइ जालें नाइको ' : तेनें भणितलें : ' वेळो-वेळा पूत्रमूखतऱ्ही देखेचि : आन आनीकीयेवळा शव तऱ्ही डोळा देखेचि : तूंवा हे ऐसें केलें : भणौनि बाळ अदृश्य जालें : ये वेळे पूत्रमूख न देखेचि ! ' : अर्जूनें भणितलें : ' भटो : कोपत का असा : कोपो नको : लेकरु आनीन कां अग्णीप्रवेशु करीणे : मग ब्राह्मण रडतरडत काकूलती बोलीला : ' तू काइ मा तूझी प्रतीज्ञा काइ : आपूलीया प्रतीज्ञा तू मरसी : अैसेनि तुवाही मरावें म्हणा : मा मी तीये कोंतीयेचेनि श्यापें के रीगेन ' : अर्जूनें भणितलें : ' भटो मज शूद्धी करू देया ' : तैसेंचि अर्जून स्वर्गासि गेले : स्वर्गी पाहीलें : अवघा स्वर्गलोकु धांडोळीला : तंवं तेथ नाही अष्टौलोकपाळाचीया ठायासि गेला : तयातें पुसिलें : ' तूम्ही लेकूरुवें आनीली असति ? ' : तेही भणितलें : ' आम्ही नाही आनीला : मा आनीली असतील तरि पाहापा ' : मग येमलोकासि गेला : तेथही शुद्धी न लभेचि ! : तैसेचि अर्जून द्वारकेसि आले : मग अर्जूनी काष्टें मेळवी आदरीली : आधी काष्टाचें सरण रचीलें : अग्णी प्रजळीला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्तितें पूसो ग(गे)ले : तंवं श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति व्याहाळीये गेले होते : श्रीकृष्णचक्रवर्त्ति ते आइकौणि तेथ आले : ते देखौणि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' हे काइ अर्जूनदेवहो : ' अर्जूनी भणितलें : ' जी जी : मी प्रतीज्ञाहत जाला ' : भणौनि अवघा वृत्तांत सांघीतला : श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति भणितलें : ' अर्जूनहो तरि आता काइ कराल ' : अर्जूनी भणितलें : ' जी जी : मी प्रतीज्ञाहत जाला : तरि मी अग्णीप्रवेश करीण ' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' तूम्ही शूद्धी केली ? ' : ' जी : केली ' : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति

भणितलें : 'आता चाला जावो आम्ही तूम्ही शूद्धी करू' : 'ना मी केली : मी अग्णीप्रवेशचि करीण' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'आम्हातूम्हा शूद्धी नव्हवे तरि अग्णीप्रवेश करा : आनि काइ : चोराचांडाळा दशरात्री पंचरात्री असे : तथा आति' : 'हो का जी' : तैसाचि नंदीघोष रथु आनीला : दोघें रथावरि आरूढ जाले : अैसे दोघै रथी बैसौणि नीगाले : अर्जूनासहीत क्षीराब्धिचेनि मार्गें बीजें केलें : स्वर्गाचा दारवठा पावता श्रीकृष्णचक्रवर्त्ति अर्जूनातें भणितलें : 'अर्जूना ये पायीरीवरि पावो नको देवो' : 'होका जी' : मग पूढा नीगाले : लोकालोक-पर्वतवेन्ही रथेंसी बीजें केलें : पूढा रथा जावेया गति नाही : जंवंपर्यंत रथासि गति होती तंवंपर्यंत नेला : तेथौनि रथु राहीला : तेथौनि साऊमे चरणचारी बीजें केलें : पूढा अंधःकार : तेथौनि सूदर्शनाचेनि प्रकाशें बीजें केलें : मग : पर्वतापूढा अंधःकार पडीला असे : साऊमा मार्ग गमेना : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति आपूंलीये श्रीमूर्तीचा प्रकाश दाखऊनि साऊमे बीजें केलें : साऊमे सूर्याचे रश्मीतेज समीप : ते अर्जूनासि साहावेना : तेथ श्रीकृष्णचक्रवर्त्ति पूढा : मागा सूदर्शन : मध्ये अर्जून : अैसें बीजें केलें : साऊमी सूवर्णाची भूमीका : काश्मीराची भूमीका : तेथ सोनेंयाची काश्मीराची मंदीरें : अैसीया क्षीराब्धिप्रवेशा बीजें केलें : क्षीराब्धि पातले : श्रीकृष्णचक्रवर्त्तितें आइकौणि सपरीवारें सेखसायीया साऊमा आला : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागला : केशी श्रीचरण झाडौनि नमस्कार केला : मग वीनऊनि सकळ महोत्साह केला : श्रीकृष्ण-चक्रवर्त्तितें— अर्जूनातें आपूलीया राऊंळासि घेऊनि गेला : माचेंयावरि आसन रचीलें : नववीधाभक्ती शोडशोपचारी पूजा केली : शेषसाये श्रीकृष्णचक्र-वर्त्तिचा श्रीकंठी नीळोत्पळाची माळा ओळगवीली : अमृताचा पाहूनर केला : कापूरेंनीबंद्ध बीडा हाला[३] : सेखसायें आपूलें मंदीर श्रीकृष्णचक्रवर्त्तिपूढा पाठवीलें : तंवं तेथ वृंदा होती : तीया श्रीकृष्णचक्रवर्त्तितें दंडवतें केलें : मग शेखसाये श्रीकृष्णचक्रवर्त्तितें लक्ष्मीचीया राऊळासि घेऊनि गेला : मग लक्ष्मीया श्रीकृष्णचक्रवर्त्तिचे श्रीचरण केशी झाडीले : सोनेयाचा परीयेळी रत्‍णाचे दीप ऐसें वोवाळीलें : मोतीया मानीकाची पूजा केली : तेथ सेखसाये श्रीकृष्ण-चक्रवर्त्तीची स्तूति केली : मग ते सात बाळकें तीचेंया माचेंयाबूढूनि काढीली : तीये श्रीचरणावरि घातली : मग हात जोडुनि पूढा ऊभा ठाकला : मग भणितलें :

---

३. या संकेताक्षराचे वाचन 'हा' असे होते. त्यावरून मी 'हाला' असे वाचन केले आहे. 'होणे' या क्रियापदाचे ('जाला' या अर्थी) हे भूतकाळाचे रूप तर नव्हे ?

'जी जी : मज बोल लागला : सर्वज्ञांसी मीया आसळैगै केली : येही आग्रहो घेतला भणौनि मीया ये सातै लेकूरुवें आनीली : जी जी : सर्वज्ञ अेथ अेऊनि मज सनाथ केलें' : तैसेचि श्रीकृष्णचक्रवर्त्ति बाळके घेऊंनि अर्जूनासहीत बीजें केलें : लक्ष्मी वृंदा सेखसाया अैसे तीयें श्रीकृष्णचक्रवर्त्तीसि अनूवर्जीत नीगाले : श्रीकृष्णचक्रवर्त्ति तयातें राहावीते जाले : सेखसाया राहीला : लक्ष्मी वृंदा न राहातीचि : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति वृंदेतें भणितलें : 'तूम्ही राहा : तूम्हासि पूढा पूणरूपी दर्शन देइजैल' : भणौनि मस्तकी श्रीकरु ठेवीला : आन भणितलें : 'आता आमचा होती अेथ असा' : तीया भणितलें : 'जी जी : मी न राहे' : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति तया स्थीति संचरली : इतूकेनि तीये राहीली : लक्ष्मीसि वेध लागला : लक्ष्मी सरीसी नीगाली : तेव्हळि अर्जूनें भणितलें : 'जी जी : लक्ष्मी येताये :' तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति ऊभे राहीले : श्रीमुकुटावरि श्रीकर ठेऊनि तयातें राहावीते जाले : त्या भणितलें : 'जी जी : मी न राहे : अेथ मज नसवे' : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्ति त्याचा मस्तकी श्रीकर ठेऊनि भणितलें : 'आता आमचा होती अेथ असा' : लक्ष्मीया भणितलें : 'जी जी : मज आदूलें प्रेम दयावें : आसन दयावें :' श्रीकृष्णचक्रवर्ति भणितलें : 'अेथौनि तूम्हा नवया भेटि दीजैल' : इतूकेनि लक्ष्मी श्रीकृष्णचक्रवर्त्तिचीया श्रीचरणां लागली : श्रीचरणू सोडु न सके : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति तयाचीया माथेयावरि श्रीकरु ठेऊनि 'राहा' अैसें भणितलें : या शब्दासरींसी तया रूपदर्शनी वीद्या दीधली : तेणें देखत असे : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति बीजें केलें : मार्गी अर्जूनदेवी भणितलें : 'जी जी : ये सरीसी येत होती तरि का येवो नाही दीधली ?' : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'भले हो हां गा जयाचीया जा(ठा)या जाइजे तयाचीया काइ बाइला नेइजेति ? : तथा स्त्रीया ? : तथा बाइका ?' : तैसेंचि तेथौनि बीजें केलें : स्वर्ग ऊत्तरता श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'अर्जूनदेवहो : हे पायीरी चूकवावी' : 'होका जी' : मग अर्जूनीं पुसिलें : 'हाजी : सर्वज्ञ पायीरीवरि पावो नेदीतीचि काइ ? : मागा वारीलें : आता तरि वारीलें' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'तूमचा पीता ब्राह्मणहत्यातवं ग्रहो जाला : तो तीये पायीरीवरि असे : भणौनि' : अर्जूनदेवी भणितलें : 'जी जी : तो या ग्रहत्वापासूनि मूंचे अैसे काही असे ?' : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : 'अेकु याग करा : मा मुंचैल' : तैसेचि श्रीकृष्णचक्रवर्त्ति द्वारावतीये बीजें केलें : सभामंडपी बळिभद्रातें भणितलें : 'आम्हास्तव सूद्धी नव्हवेचि तूम्हास्तव सूद्धी नव्हवेचि : हाहो अेकीअेकु अर्जून : सूद्धी करूणि लेकूरुवें घेऊनि आला :' इतूकेनि अवघे यादव ठकाचि ठेले : मग श्रीकृष्ण-

चक्रवर्त्ति तया ब्राह्मणातें पाचारूणि भणितलें : 'ये लेकूरुवें अर्जूनें आनीली : ते तूम्ही घेया : ' तेनें घेतलीं : इतूकेनि तो संतोषीया जाला : ब्राह्मणें भणितलें : 'गा अर्जूना तू सदा जयवादी होसी' : इतूकेनि तो गेला : श्रीकृष्ण-चक्रवर्त्ति अर्जूनातें श्रीकरी धरूणि ऋक्मीणी देवीचीया राउळा बीजें केलें : । महदाइसी पुसिलें : 'जी जी : वृंदालक्ष्मी श्रीकृष्णचक्रवर्त्तिसरीसी नीगाली : तरि तयासि काही क्षोभु न पडेचि ? : ऊगाचि का राहीला ? ' : सर्वज्ञें म्हणितलें : 'बाइ : क्षीराब्धिची देवता अवीक्रीये : ब्रह्म : अवीक्री वस्तू ।१। शेषसायीयाचा ठायी वीकारु नाही :।१।: तथा बाइ : ते अवीक्रीये देवता : तीचा ठाइ वीकारू नाही ' : ।१। : मग अर्जून इंद्रप्रस्तासि आले : यूधीष्ठी राजवळि अवघा वृत्तांत सांघीतला : पंडुची व्यवस्था सांघीतली : तेव्हळि धर्में राजसुयज्ञ केला " : ।। ७५ ।।

खांडुवनदहन - कथन : ।। ।।

महदाइसी पुसिलें : "जी जी : श्रीकृष्णचक्रवर्त्ति खांडवन कां जाळीलें ? : ते कथा नीरोपावी जी " : सर्वज्ञें म्हणितलें : "बाइ : एकु दी श्रीकृष्णचक्रवर्त्ति इंद्रप्रस्ती येमूनेसी पांडवासहीत जळकेळी खेळत असति : तंवं तेथ अग्णी ब्राह्म-णाचेनि वेषें श्रीकृष्णचक्रवर्त्तिचीया दर्शना आला : श्रीकृष्णचक्रवर्त्ति तयाचें स्वागत केलें : मग पुसिलें : 'येथ कवणा कार्या बीजें केले ? ' : ब्राह्मणें भणि-तलें : "पूर्वीं कृतयूगी स्वेतकेत अेनें नामें राजा होता : तेनें शतसहस्र वर्षें वृत-धारी यज्ञ केला : तेणें मज मांद्य पडीलें : जळोंदर वाढीन्नलें : मग मीया अस्वी-नीदेवातें पुसिलें : तेणें भणितलें : 'खांडोवन जाळी : तेणें तूझें जळोंदर समैल ' : मग मी ब्रह्मयाजवळि गेला : तयातें भणितलें : 'माझें जळोंदर समावयालागी खांडोवन द्यावें ' : ब्रह्मेनि भणितलें : 'घे जाये ' : इतूकेनि मी खांडोवन जाळु लागला : तंवं इंद्रें मेघ पाठवीले : तेही मातें वीझवीलें : अन्येकें कराळें भूतें ऊठीली : तेही मातें पराभवीलें : अैसें मीया तीन तोरणें वाइलें : परि माझें-यास्तव खांडोवन जाळवेचि ना : तैसेंचि मीया ब्रह्मयाजवळि जाऊनि आपूला वृत्तांत सांघीतला : ब्रह्मेनी भणितलें : 'आतां द्वापराचा अंती : श्रीकृष्ण अर्जून जन्मतील : ते तूज खांडोवन देतील ' : अैसें ब्रह्मेनि भणितलें : भणौनि मी अेथ आला " : तैसेचि श्रीकृष्णचक्रवर्त्ति अग्णीसहीत अर्जूनेंसी स्वर्गासि बीजें केलें : अर्जूनाकरवी खांडोवनावरि अग्णीबाण घालवीला : इतूकेनि अग्णी खांडोवन भस्मभूत केले : तेव्हळि इंद्र यूध्यालागी आला : ती अर्जूनी पराभवीला : मग अग्णी अर्जूनासि अक्षयभातें दीधलें : मग अग्णी आपूलीया स्थाना गेला : श्रीकृष्ण चक्रवर्त्ति अर्जूनासहीत इंद्रप्रस्तासि बीजें केलें " :।।७६।।

राजसूययागागमण – कथन : ।। ।।

एकु दी : दायंबाये पुसिलें : “ जी जी : पांडवी राजसूययज्ञ कवणा कार्यालागी केला ? ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ भोजया : पंडु ग्रहत्वापासौनि मुंचावया यूधीष्ठीरें राजसूययज्ञ केला ” : दायंबाये भणितलें : “ जी जी : तो कैसा केला ? ” : सर्वज्ञें भणितलें : “ भोजया : अर्जूनी खांडोवन जाळीलें : तेथ चतूर्वीध भूतग्राम जळीन्नला : त्यांतु दैत्यांचा वार्धीकी मय होता : तो अर्जूनासि शरण आला : मग तो त्याचीया बंद्धूसहीत रक्षीला : मग मये अर्जूनातें भणितलें : ‘ मातें दळ द्रव्य बहूत असे : ते अंगीकरावें ’ : भणौनि संपादीलें : मग ते अर्जूनी अंगीकरीलें : मग अर्जूनी यूधीष्ठीरासि भेटवीला : मग मये भणितलें : ‘ मी सभामंडप करीण ’ ते यूधीष्ठीरें मानीलें : मग मये आपूलेनि परीवारेंसी सभामंडप ऊभीला : तेथ बरवी मंदीरें कामवीली : वीचीत्र ऊभनी ऊभोलीया : बरवी जळस्थळें भूवनें रचीली : अैसा सभामंडपु जालेंयानंतरें एकु दी यूधीष्ठीर सुधर्मसभे बैसला असे : तंवं तेथ नारदु आला : यूधीष्ठीरें नारदाचें बरवें स्वागत केलें : यूधीष्ठीरें भणितलें : ‘ जी जी स्वामीया : कवणा कार्या बीजें केलें ? ’ : नारदें भणितलें : “ आगा राया मी ब्रह्मलोका जात होता : तंवं ब्रह्मलोकी तूझा पीता ग्रहो जाला असे : तेणें अैसें भणितलें : ‘ तूम्ही मृत्यलोका जाऊनि यूधीष्ठीरासि अैसें सांघावें जे ब्रंह्महत्येतंवं तूझा पीता ग्रहो जाला असे : तेणें अैसें भणितलें असे : राजस यज्ञ करावा : मा मी या ग्रहत्वापासूनि मूंचैन ’ : ” यूधीष्ठीरें श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि आफावीलें : यूधीष्ठीरें वीनवीलें : ‘जी जी : राये राजसुयज्ञ करवीला असे : तो मज कैसेनि हो सकैल ? ’ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : तूम्ही करू रीगा : मग अयौनि सीद्धी नेइजैल ’ : यूधीष्ठीरें रायारायाचीया कूमरासि मूळें पाठवीली : मग यूधीष्ठीरें वीनवीलें : ‘ जी जी: सर्वज्ञ अेथ आपूलेनि सपरीवारेंसी बीजें करावें जी ’ : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथौणि द्वारावतीयेसि बीजें केलें : मग : मासा येका यूधीष्ठीरें आपूला पूरोहीत ब्राह्मण श्रीकृष्णचक्रवर्त्तीसि मूळ पाठवीला : मग : श्रीकृष्णचक्रवर्त्ति तेथौनि धर्माचीया नगरासि सपरीवारे निगते जाले : सवें श्रीकृष्णचक्रवर्त्तिची अंतःपूरें नीगाली : अेकिअेकी राणीयेचीया तीन तीन परीचारीका : अैसी शतें आगळी सोळासहस्र अंतःपूरें : यावेगळीया आपूलालेनि परीवारेंसी अष्टौपट्ट महीषी : अेकलक्ष्य साटिसहस्र आगळे असी । १६०००८० । इतूके कूमर : जेतूकीयाचि राणीया तेतूकीयाचि कूमरी । १६१०८ । छपन्न कोटी यादव तयाची अंत पूरें : अैसे श्रीकृष्णचक्रवर्त्ति इंद्रप्रस्तासि बीजें केलें : मग यूधीष्ठीर सपरीवारी साऊमा आला : यूधीष्ठीरें मंगळमहोत्सायेसी नगरामध्ये नेलें : यूधीष्ठीरें इतूकीयासि राऊळगणें







दीधली : यूधीष्ठीरें पृथवीचे राये मंडळीक देव ऋषी मूनी बोलावीले : त्यासि समस्ता नगराची ऊद्यानी मेल्लीकारु दीधला : यदनंतरें देवकीदेवीमूख्य करूणि श्रीकृष्णचक्रवर्त्तिची अंत:पूरें यूधीष्ठीराचीया राऊळगणासि कूंतीदेवी द्रौपदीयेसी भेटावया नीगाली : देवकीदेवीची परीचारींका कूंतीदेवीजवळि सांघो आली: जे 'देवकीदेवी तूमचेंया दर्शना येत असे' : तंवं श्रीकृष्णचक्रवर्त्ति आधीचि कूंती-देवीचीया राऊळासि बीजें केलें होतें : तेंथ द्रौपदी श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि भेटों आली होती : तेव्हळि श्रीकृष्णचक्रवर्त्ति द्रौपदीदेवीसि भणितलें : 'तूम्ही देवकीदेवीसि नमस्कार करावा : मग अेथीचीया राणीया तूम्हासि नमस्कार करीती : अेथी-चीया राणीया तूम्हासि रळीया बोलतील : तरि तूम्ही तयासि बरवेंचि ऊत्तर दयावें हो' : अैसें श्रीकृष्णचक्रवर्त्ति द्रौपदीयेसि बोलौणि देवकीदेवीपासी बीजें केलें : श्रीकृष्णचक्रवर्त्ति देवकीदेवीसि भणितलें : 'माये तूम्ही कूंतीदेवीसि नमस्कार करावा' : तैसेंचि अंत:पूरासि भणितलें : 'जी जी : आम्हासि सर्वज्ञांची आज्ञा प्रमाण' : अैसें बोलौणि श्रीकृष्णचक्रवर्त्ति सभामंडपासि बीजें केलें : तंवं देवकीआऊसाचे काठीकार मांदी सारीत आले : मग पैलाकडौणि कूंतीदेवी द्रौपदीदेवीमूख्यकरूणि पांडवाची अंत:पूरें सांऊमी आली : मग देवीकीदेवीया कूंतीदेवीसि नमस्कार केला : कूंतीदेवी नमस्कार करू नेदीतीचि : वरिचीयावरि धरूणि क्षेमाळींगण दीधलें : मग द्रौपदीया देवकीदेवीसि नमस्कार केला : देवकीदेवी नमस्कार करू नेदीतीति : वरिचीयावरि धरूणि क्षेमाळींगण दीधलें : मग रूक्मीणीदेवीमूख्य अष्टौपट्टमहीषी सोळासहस्र अंत:पूरी कूंतीदेवीसि नमस्कार केला : तैसाचि अवघाजनी द्रौपदीयेसि नमस्कार केला : मग बैसकारु जाला : कूंतीयेचा राऊळी थोर संभ्रमु जाला : मग समस्ता तांबोळें जाली : मग सत्यभामा द्रौपदीयेतें भणितलें : 'तूम्ही काही कौसल्य कौटल्य का मोहनकरण जाणत असा ? : पाचाही पांडवासि तूम्ही अेकचि भार्या' : तंवं द्रौपदीया भणितलें : 'हो मी वसिकरण जाणे : अैसें कव्हणीचि नेने : का पा मीया तेथौनि तूमतें आकर्षौ-(र्षां)नि आनीलें : आन दादो माझा हाकारीलेंया येति : पाठवीलेंया जाति : दादोवीन तेथ तूम्ही अवस्थाभूत असा : अैसें मी वसिकरण जाने' : अैसें द्रौपदीया सत्यभामेसि प्रत्यूत्तर दीधलें : मग द्रौपदीदेवी समस्ता अंत:पूरासि पाहून्नर केला : मग समस्त अंत:पूरें आपूलालीया बीढारि गेली : यूधीष्ठीरा-चीया यज्ञासि पृथवीचे राये मंडळीक आले : तेथ श्रीकृष्णचक्रवर्त्ति शीसूपाळ वधूनि यागी घातला : अैसा राजसूययज्ञ केला : तेणें पंडु ग्रहत्वापासूनि मूंचूणि ब्रह्मलोकासि गेला" : ॥ ७७ ॥

पांडवादीग्जयप्रसंगें जरासंधवध- कथन :॥ ॥

एकु दी महदाइसी पुसिलें : “जी जी : श्रीकृष्णचक्रवर्त्ति जरासंद्धु कैसा वधीला ? ” : सर्वज्ञें म्हणितलें : “ बाइ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति सपरीवारी राजसूय- यागालागी बीजें केलें : मग यूधीष्ठीरें बीनवीलें : ” जी जी : राजसुयागालागी द्रव्य अपूरे : तरि काइ करावें ’ : मग श्रीकृष्णचक्रवर्ति यूधीष्ठीरासहीत कुबीरा- चेया ठाया बीजें केलें : तंवं कूबीर साऊमा आला : दंडवते घातली : श्रीचरणा लागला : मग कूबीरें धर्मासहीत श्रीकृष्णचक्रवर्त्तितें आपूलीया राऊळगणी नेवों आदरीलें : धर्म कूबी[ र* ] श्रीकृष्णचक्रवर्त्ति ऐसे तीघे राऊळगणांत जाताति : तंवं कूबीराचा माहाद्वारी वाहान बांधली असे : ते देखौणी श्रीकृष्णचक्रवर्त्तितें यूधीष्ठीरें पुसिलें : “जी जी : हे अैसें काइ ’ ? : श्रीकृष्णचक्रवर्त्ति कूबीरातें पुसिलें : ‘ कूबीरदेवहो : हे अैसें काइ ? ’ : तंवं कूबीरें भणितलें : ‘ जी जी : जेणें जेणें मानें हे द्रव्य नेइजे तेणें तेणें मानें आनौणि देइजे : ते तो जरि मागौता आनौनि नेदी : तयावरि हे वाहान ऊभीली असे ’ : इतूकेनि यूधीष्ठीर भीयाला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्तीसि यूधीष्ठीरें भणितलें : “ जी जी : हे द्रव्य यासी नको मागो : जैसें नेववैल तैसें काइ देववैल ? ” : मग कूबीरें पाहून्नर केला : कूबेर द्रव्य देत होता ते नघेतीचि ! : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति यूधीष्ठीरांसहीत बळीचक्रवतीचीया ठाया बीजें केलें : श्रीकृष्णचक्रवर्ति आन यूधीष्ठीर बळीभूवनासि जाताति तंवं मार्गी सूवर्णाचीया पातळीचे डोंगर पडीले असेति : ते देखौणि यूधीष्ठीरें पुसिलें : ‘ जी जी : हे पर्वत काइसे ? ’ : श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ‘ राजे हो बळीचक्रवती राजसूययाग केला : तेथ तेही अठ्यासीसहस्त्र ऋषीस्वरासि सूवर्णाचीया पातळीयावरि भोजनलें : ऋषी जेवीति : आन ऊकरडेयावरि सांडीति : तयाचे डोंगर जाले असे ’ : इतूकेनि यूधीष्ठीरासि थोर आश्चर्य जालें : बळीचक्रवर्त्ती श्रीकृष्णचक्रवर्त्तीसि साऊमा आला : दंडवतें घातलीं : श्रीचरणां लागला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति बळीचक्र- वतीचीया राऊळासि बीजें केलें : बळीचक्रवर्त्ती श्रीकृष्णचक्रवर्त्तिची पूजा केली : आरोगणा केली : कापूरेंनीबंद्ध वीडे जाले : मग बळीचक्रवर्त्ती वीनवीलें : ‘ जी जी : अेथ सर्वज्ञ कवणा कार्या बीजें केलें : तें आज्ञापीजो ’ : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति यूधीष्ठीराकडे श्रीकर करूणि भणितलें : ‘ यूधीष्ठीरराये राजसूययज्ञ मांडीला असे : भणौनि हे तूमतें बोलाऊ आलें असे ’ : बळीचक्रवती भणितलें ‘ जी जी : सर्वज्ञ सामधी करावी : तंवं मी येइन जी ’ : मग बळीचक्रवती यूधीष्ठी- रासि चींतामणीमूल्य नवरत्नें दीधली : मग यूधीष्ठीरासहीत इंद्रप्रस्तासि बीजें केले : मग यूधीष्ठीरें भणितलें : ‘ जी जी : हे नव[ र* ]त्नीं काइ होइल ? :

हे द्रव्य यागासि अपूरे ! ' : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति भणितलें : ' राजेंद्रो : भीमसेन अर्जून नकूळ साहादेव हे चौघें चौ दीसा पाठवावे : मा चहू दीसाचे राजे वीभांडूणि तयाचें द्रव्य आनीती ते पूरैल ' : मग श्रीकृष्णचक्रवर्ति भीमसेनातें भणितलें : ' भीमसेना तूम्ही पूर्वदीशाचे राजे वीभांडावे : तयाचें द्रव्य आनावें : ' मग भीमसेन नीगाले : तैसेंचि साहादेवातें दक्षीण दीसेसि पाठवीलें : नकूळासी पश्चीम दीसेसि पाठवीलें : अर्जूनासी ऊत्तर दीसेसि पाठवीलें : मग भीमसेनें-नकूळसाहादेवे तीही दीशाचे दीक्पाळ मुख्य करूणि समस्त राये वीभांडौनि द्रव्य आनीलें : अर्जून ऊत्तरदीसेसि गेले : तेंही कूबीरमूख्य समस्ता राया वीभांडीलें : द्रव्य जींतीलें : इंद्रप्रस्तासि पाठवीलें : मग आपण जरासंदावरि गेले : जरासंदेसी यूध्य जालें : मा जरासंदें अर्जूनातें भंगीलें : अर्जून आपूलीया नगरा न येतीचि : मध्येचि लाजीलें : अैसे राहीले : ते आइकौणि यूधीष्ठीरें अपरीतोख पावीला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति भीमसेनासहीत अर्जूनापासी बीजें केलें : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति ब्राह्मणाचा वेष धरूणि भीमसेना–अर्जूनासहीत जरासंदाचिया नगरा बीजें केलें : तेथ श्रीकृष्णचक्रवर्ति जरासंदाची दोन्ही धडे भीमसेनाकरवी ऊत्तटवीली : मग बंदीशाळेसि बीजें करूणि समस्त राजे सोडवीले : जरासंदा-चीये राणीवेसी जरासंदाचा पूत्र स्थापीला : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति जरासंदाचे द्रव्य घेऊनि पेणोवेणा इंद्रप्रस्तासि बीजें केलें " : ॥ ७८ ॥

## राजसूययागी सर्पदष्ट ब्राह्मणरक्षण–प्रसंगें भीस्मादीदर्पहरण–कथन :॥ ॥

एकु दी : महदाइसी पुसिलें : " जी जी : ' या भीस्मासि काळ आन काम अंकणा असे जी ' अैसें पौराणीक बोलताति : हे साच जी ? : " सर्वज्ञें म्हणितलें : " आति : बाइ : भीस्मासि आपूलीया ब्रह्मचर्याचा थोर गर्व होता : तो श्रीकृष्णचक्रवर्त्ति हरीला " : महदाइसी भणितलें : " जी जी : तो कैसा ? " : सर्वज्ञें म्हणितलें : " बाइ : यूधीष्ठीरें राजसूययज्ञ मांडीला : तो आइकौणि दोघें यूग्में ब्राह्मणें अेत होती : तीये मागी येता अेकी ठाइ राहीली : श्रांतली भणौनि अेका वृक्षाखाली नीजैली : तवं तीयेचा पती सर्पे डंकीला : मग ते ऊठौणि पाहे तवं सर्पदृष्ट जाला असे : मग ते धाये मोकलूणि रडो लागली : मग तीया काष्टें मेळऊनि सरण रेइलें : ' पतीसहीत अग्नीप्रवेश करीण ' : भणौनि शव शरणावरि घातलें : तवं आशीरीरी वाचा जाली : " आवो ब्राह्मणी : यूधीष्ठीरें राये राजसूययाग मांडीला असे : तेथ अठ्यासी सहस्त्र ऋषी तेतीस कोडी देव मीळाले असति : रायारायाचे कूमर मीळाले असति : दीक्षीत तापस सन्यासी मीळाले असति : त्यांत

जे बाळब्रह्मचारी असतील : तयाचेया पायाचेया आंगोठयाचेनि स्पर्शें हे दाटी ऊठैल' : मग तीया ते शव पाठीसी बाइलें : तेथौनि नीगाली : ते यागासि आली : मग शव यागमंडपद्वारी घातलें : आन रूदन करू लागली : तीयेतें पुसिलें : 'तू कवण वो रुदन करीत असेसि ? हे शव काइसें ?' : मग तीया पूर्ववृत्तांत सांघीतला : ब्राह्मणी ऋषीस्वरातें भणितलें : 'तूम्हामध्ये जो बाळब्रह्मचारी असैल तो हे दाटी ऊठवा : नाहीतरि मी अग्णीप्रवेश करीण : ते पाप तूम्हा अवघेया लागैल' : हे देवाऋषीसमस्ता साकंडें पडीलें : अेरअेराकडे पाहो लागले : तेव्हळि समस्ती भीस्मातें भणितलें : 'तूम्ही काळकाम अंकणा घातला असे : तरि हे दाटी ऊठवा' : मग भीस्में जाऊनि तया शवासि पायीचा आंगोठा लावीला : परि ते शव नूठीचि ! : इतूकेनि भीस्म लाजीला : दर्पु हरीला : मग समस्ती नारदातें भणितलें : 'नारदमूनीहो हे दाटी ऊठवा :' नारदें शव स्पर्शीलें : परि ते नूठीचि ! : तेव्हळि यूधीष्ठीरें दूर्वासिंयातें भणितलें : 'तूम्ही बाळब्रह्मचारीः तरि हे दाटी ऊठवा :' दूर्वासेनि भणितलें : 'आम्ही बाळब्रह्मचारी नव्हो : हा शूकदेव बाळब्रह्मचारी असे :' शूकदेवें भणितलें : 'भीस्माचेनि– नारदाचेनि काइ जाले ? मा माझेनि होइल ? : मा काइ ?' : अवघा भणितलें : 'होये ना काः परि हे दाटी ऊठवा :' मग शूकदेवें ते शव स्पर्शीलें : परि तयाचेनि ते शव नूठीचि ! : मग यूधीष्ठीरें समस्ता ऋषीतें भणितलें : 'तूम्हांत बाळब्रह्मचारी असैल तो हे दाटी ऊठवा:' तेव्हळि ऋषी अेकमेकाकडे पाहाति : आन भणति : 'तूम्ही तंवं आम्हासि जाणता असा : आम्ही बाळब्रह्मचारी नव्हो' : मग शूकदेवें यूधीष्ठीरातें भणितलें : 'हा श्रीकृष्ण बाळब्रह्मचारी असे' : तेव्हळि यूधीष्ठीरें श्रीकृष्णचक्रवर्त्तिसि भणितलें : "जी जी : सर्वज्ञ बाळब्रह्मचारी होतील तरि हे दाटी ऊठवावीः' तंवं श्रीकृष्णचक्रवर्त्तितें भणितलें : 'अेथ अंतःपूरें असति : हे ब्रह्मचारी नव्हे : इतूके ऋषी असति : मा याचेनि काइ नव्हवे ?' : मग समस्ती ऋषी श्रीकृष्णचक्रवर्त्तितें वीनवलें : "जी जी : आम्ही बाळब्रह्मचारी नव्हे' : मग श्रीकृष्णचक्रवर्त्ति तया शवाजवळि बीजें केलें : ते देखौनि समस्त कौरव हासीन्नले : त्याचा मूखी श्रीचरणाचा आंगोठा घातला: श्रीकरी झारी घेऊनि धार दीधली: तेणें श्रीचरणोदक तयाचीया मखामाजी गेलें : तंवं ते दाटी खडपडौणि ऊठीली: ब्राह्मण जीयाला: श्रीकृष्णचक्रवर्त्तिचीया श्रीच[र*]णा लागला: ते देखौणि कौरवासि आश्चर्य जालें : तेव्हळि देवी ऋषी जयजयकारु केला : स्तुति केली: मग पुस्पवर्षाव केला : अैसा श्रीकृष्णचक्रवर्त्ति भीस्मादीकाचा गर्व हरीला : बाई" : ॥७९॥

◆ ◆ ◆

श्री. वा. रा. जवाहिरे

# लोकशाही विरुद्ध हुकूमशाही

## अर्थात्

## लोकशाहीच का ?

भारत स्वतंत्र होऊन २८ वर्षे झाली. नुकताच प्रजासत्ताकाचा रौप्य महोत्सव भारताने साजरा केला. तथापि आर्थिकदृष्टया भारत फारच दुरवस्थेत आहे. मोठ्या प्रमाणात चलनवाढ, वस्तूंची साठेबाजी, चोरटा व्यापार, वस्तूंची दुर्मिळता, भाववाढ, बेकारी व भ्रष्टाचार असे भारताचे आजचे आर्थिक चित्र आहे. अशा या परिस्थितीत भारतात जर हुकूमशाही असती किंवा हितकारी ( बेनिव्होलंट ) हुकूमशहा असता तर हे प्रश्न निर्माण झाले नसते किंवा मागेच निकाली निघाले असते असे भारतामध्ये अनेक जणांना वाटते; आणि म्हणून अजूनही भारतात निदान काही काळाकरिता हुकूमशाही सुरू करणे इष्ट होईल असे या मंडळींचे म्हणणे आहे. अशा स्थितींत लोकशाही व हुकूमशाही यांच्या गुणावगुणांची तपासणी करणे आणि त्यांची वाटचाल कशी घडते याबाबतचाही विचार करणे अत्यंत आवश्यक व निकडीचे ठरते.

२. लोकशाहीवरील आक्षेप

वर नमूद केल्याप्रमाणे अप्रगत राष्ट्रांबाबत लोकशाहीवरील किमान आक्षेप असा आहे की, वस्तूंची साठेबाजी, चणचण, उत्पादनात घट, भाववाढ बेकारी, भ्रष्टाचार हे प्रश्न निर्माण हऊ नये म्हणून किंवा त्यांचे निराकरण करण्यासाठी अप्रगत राष्ट्राने प्रथम हितकारी हुकूमशहाच्या हस्ते चांगले निर्णय करून घेऊन आर्थिक प्रगति करून घ्यावी आणि नंतर पाहिजे तर लोकशाहीचा कारभार सुरू करावा. यावर लोकशाहीची बाजू अशी आहे की वर उल्लेख केलेले दोष हुकूमशाही राष्ट्रांमध्येही असतात. कम्युनिस्ट राष्ट्रांमध्ये सुद्धा जीवनोपयोगी वस्तूंची चणचण, उत्पादनात घट, या गोष्टी बहुतेक नेहमीच असतात कारण पोलाद, यंत्रे आदि अवजड वस्तू व युद्धोपयोगी वस्तूंची निर्मिती हे कम्युनिस्ट राजवटीचे उद्दिष्ट असते. त्यामुळे सोव्हिएट रशियासारख्या प्रगत कम्युनिस्ट राष्ट्रांतील सामान्य नागरिकाचे किमान उत्पन्न इटलीसारख्या देशातील नागरिकापेक्षा जास्त नाही. कम्युनिस्ट व

अनुक्रमणिका





अन्य हुकूमशाही राजवटीत होणारी आर्थिक भ्रष्टाचाराची उदाहरणे, हुकूमशाहीतील समाजव्यवस्थेमुळे, लोकांच्या नजरेस येऊ शकत नाहीत. तथापि विशिष्ट व्यक्तीच व विशिष्ट समाजगटच ( मॅनेजेरियल क्लास ) हुकूमशाहीत दीर्घकाल अधिकाराच्या जागांवर राहतो. एवढ्या एका गोष्टीवरूनच सिद्ध होते की कम्युनिस्ट व इतर हुकूमशाही राष्ट्रात आर्थिक भ्रष्टाचार चालू असतो. याखेरीज अन्य प्रकारचा भ्रष्टाचार सर्व प्रकारच्या हुकूमशाही राजवटीत व तथाकथित हितकारी हुकूमशहाच्या राजवटीत देखील सतत चालू असतो. भाषणस्वातंत्र्य नसणे, विनाचौकशी तुरुंगात अगर बंदिशाळेत (कॉन्सेन्ट्रेशन कँप) टाकणे, लोकांना खऱ्या बातम्या मिळू न देणे, हा मोठ्या प्रकारचा भ्रष्टाचार असून, तो सर्व प्रकारच्या हुकूमशाहीत सातत्याने घडत असतो. किंबहुना अशा भ्रष्टाचाराच्या पायावरच हुकूमशाही आधारलेली असते.

### ३. लोकशाहीवरील आणखी आक्षेप

लोकशाहीवर आणखी एक प्रमुख आक्षेप घेतला जातो की, "लोकशाहीत त्वरेने निर्णय होत नाहीत, हुकूमशाहीत ताबडतोब निर्णय घेतले जातात. तसेच लोकशाहीमधील मतामतांच्या गलबल्यांत गोंधळ माजतो व त्यामुळे लोकशाहीत चांगला व हितकारक निर्णय होत नाही." या मुद्यावर वस्तुस्थिती अशी आहे– हुकूमशाहीमध्ये निर्णय घेण्याचे काम फक्त एकदा हुकूमशहा करतो किंवा हुकूमशाहीतील तीनचार जणांचे नियंत्रक मंडळ करते. साहजीकच हुकूमशाहीत निर्णय लवकर होऊ शकतात. तथापि लोकशाहीतच चांगले व हितकारक निर्णय घेतले जाऊ शकतात. हुकूमशाहीत तसे निर्णय सहसा घेतले जाऊ शकत नाहीत. निर्णय त्वरेने घेण्याच्या जरूरीपेक्षा तो चांगला व हितकारक घेणे कितीतरी पटीने जरूर असते. लोकशाहीमध्ये निरनिराळी शिष्ट मंडळे, संस्था. समित्या, तज्ज्ञ मंडळी, मंत्रिमंडळ, विधिमंडळ आणि शेवटी राज्यपाल व राष्ट्राध्यक्ष अशा अनेक पातळ्यांवरून विचार व भूमिका मांडली गेल्यानंतर अंतिम निर्णय होतो. त्यामुळे निर्णयाच्या वेळी विषयाच्या सर्व बाजू सांगोपांगपणे पुढे येतात. परिणामी लोकशाहीमध्ये विषयावरील विचारात व माहितीत गोंधळ मुळीच होत नाही. आणि त्यामुळेच चांगला व हितकर निर्णय लोकशाहीत घेतला जाऊ शकतो. लोकशाहीच्या या मोठ्या गुणामुळेच विविध लोकशाही राष्ट्रांनी आतापर्यंत आर्थिक क्षेत्रात मोठमोठे पराक्रमाचे टप्पे पूर्ण केले आहेत. या उलट हुकूमशाहीमध्ये फक्त एकटा हुकूमशहा अगर तीनचार नियंत्रक निर्णय घेत असल्यामुळे, आणि हुकूमशाहीच्या दडपणाच्या वातावरणा-

मुळे व व्यवस्थेमुळे विषयातील वाईट अगर विरोधी बाजू किंवा अधिक चांगला पर्याय नियंत्रकांपुढे येण्याची शक्यता फारच कमी असल्यामुळे, चांगला व हितकर निर्णय होण्याचा संभव हकूमशाहीत फारच कमी असतो. शिवाय हुकूमशाहीत सत्ताधीशांना सोयीचे असेच निर्णय घेतले जाऊ शकतात. या उलट लोकशाहीत सत्ताधीशांना सोयिस्कर नसलेले निर्णय देखील घेतले जाऊ शकतात. हासुद्धा एक लोकशाही राज्यव्यवस्थेचा मोठा गुण आहे.

४. हितकारी हुकूमशाही

हुकूमशहा हितकारी असल्यास जरूर तो उत्तम निर्णय हुकूमशाहीत घेतला जातो, अशी एक भूमिका हुकूमशाहीबद्दल मांडली जाते. या भूमिकेचा अर्थ असा होतो की चांगले अगर वाईट कोणते व कसे हे जाणण्याची हुकूमशहाजवळ अगर हुकमशाहीतील सत्ताधीश मंडळींजवळ सर्वज्ञता असते, किंवा विषयाच्या सर्व बाजू व माहिती त्यांच्यापुढे येते आणि सर्वथैव जनहिताच्या प्रेरणेने व ध्येयाने ते भारलेले असतात. हे गृहीत कृत्य बरोबर नाही. जगात कोणताही माणूस कोणत्याही श्रेष्ठ पदावर असला तरी तो सर्वज्ञ असू शकत नाही. हे सर्वमान्य व सर्वसिद्ध असे सत्य आहे. तसेच हुकूमशाहीतील दहशतीच्या व दडपणाच्या व्यवस्थेमुळे व वातावरणामुळे विषयाच्या सर्व बाजू व पर्याय हुकूमशहापुढे ठेवले जाण्याची शक्यताही बरीच कमी असते. शिवाय हुकूमशहा अगर हुकूमशाहीचे नियंत्रक मंडळ हे अगोदर अधिकारावर असलेल्या राज्यकर्त्यांना रक्तपाताने किंवा दांडगाईने किंवा कौटिल्याने अधिकारावरून हुसकून लावून अधिकारावर आले असल्यामुळे, ही मिळवलेली सत्ता कसेही करून टिकवून ठेवायची हे त्यांचे सर्वप्रमुख उद्दिष्ट बनते. उत्पाताने व कौटिल्याने सत्ता काबीज केली असल्यामुळे कनिष्ठ व सहकारी मंडळींवर त्यांचा विश्वासही नसतो आणि त्याचवेळी त्यांच्यावर जनतेच्या नियंत्रणाचाही काही लगाम नसतो. अशा सर्व स्थितीत आपली सत्ता टिकवून धरण्यास पाठिंबा देणाऱ्यांचा व उपयुक्त होणाऱ्यांचा गट तयार करायचा, तो गट जोपासायचा व त्यातील मंडळींना विशिष्ट पदांवर नियुक्त करायचे अगर त्यांना अन्य प्रकारे संतुष्ट करायचे, आणि ज्यांच्याबद्दल संशय येईल त्यांचा कोणत्याही उपायांनी निःपात करायचा अशा विविध दुष्ट मार्गांनी हुकूमशहास-तथाकथित हितकारी हुकूमशहास-देखील, वाटचाल करावी लागते आणि त्यामळे जनतेचे हित करण्याची भावना असून सुद्धा, जनहिताच्या दिशेने निर्णय न घेता, वर नमूद केलेली उद्दिष्टे साध्य करण्याच्या दृष्टिकोनातून त्यांना निर्णय घ्यावे लागतात. सारांश, 'हितकारी हुकूमशाही' ही कल्पना खोटी

नाही असे मानले तरीसुद्धा, तो तथाकथित हितकारी हुकूमशहा, स्वतःच्या गुंतलेल्या हितसंबंधामुळे, जनहिताचे निर्णय घेण्याकडे सहसा वळू शकत नाही. पर्यायाने हुकूमशहा व हितकारित्व या गोष्टी परस्पर विसंगत व परस्पर विरोधी असल्याचा प्रत्यय येतो.

५. घेतलेला निर्णय बदलण्याची लोकशाहीत शक्यता

कोणताही निर्णय घेतला गेल्यावर व त्याची कार्यवाही सुरू झाल्यानंतर सुद्धा विचारप्रवर्तनाने लोकशाहीत जनमत बदलवून घेता येते व परिणामी मूळ घेतलेला निर्णय बदलवून घेता येतो. लोकशाही यंत्रणेत याप्रमाणे निर्णय बदलण्याची सहजपणे बसणारी व्यवस्था आहे. हुकूमशाहीत मात्र एकदा घेतलेला निर्णय बदलायचा असेल तर खुद्द सत्ताधीशाच्या मनातील विचारच बदलायला पाहिजे, की जी गोष्ट सहसा शक्य नसते, किंवा रक्तपात अगर उत्पात करून नवीन हुकूमशहा हा सत्तेवर आणला पाहिजे. अशारीतीने चांगले व हित-कारक निर्णय घेण्याबाबत लोकशाही ही हुकूमशाहीपेक्षा सहस्रपट सरस ठरते.

६. हितकारी हुकूमशहा ही व्यक्तिगत कल्पना

हितकारी हुकूमशहाची प्रतीक्षा करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या मनात हितकारी हुकूमशहा कसा असेल व तो प्रत्येक प्रश्न कसा सोडवील याबाबतचे चित्र प्रत्येकाच्या दृष्टिकोनानुसार व आवडीनुसार रंगवलेले असते. आपण स्वतःच हुकूमशहा व्हावे अगर झाले तर प्रश्न कसे सोडवू यावर ते चित्र आधार-लेले असते. प्रत्येकाने चितारलेली ही चित्रे साहजीकच अगदी भिन्न असतात. यांतील 'अ' चे चित्र 'ब' ला पसंत होणार नाही. म्हणजे काय केले असता हितकारक कृति होईल यात एकवाक्यता होऊ शकत नाही. याचाच अर्थ हितकारी हुकूमशहा ही एक मनोकल्पना आहे आणि हुकूमशहा व हितकारित्व या गोष्टी भिन्न व विसंगत आहेत.

७. लोकशाहीत कर्तबगार व लोकहितकारी राज्यकर्ते व — कर्तृत्ववान नागरिक यांची परंपरा

वर नमूद केलेल्या गुणांपेक्षा आणखीही अनेक गुण लोकशाहीच्या अंगी असल्याचे आढळून येते. लोकशाहीमध्ये निरनिराळ्या विषयावर जे निर्णय घेतले जातात ते घेण्यापूर्वी अगदी सामान्य नागरिकांपासून विविध बाजूंनी विचार व भूमिका मांडली जात असल्यामुळे लोकशाहीतील नागरिक बौद्धिक व वैचारिक बाबतीत प्रगत व प्रवीण असतात. हुकूमशाहीत नागरिकास स्वतंत्रपणे विचार करण्याची व विचार मांडण्याची मुभा नसल्यामुळे तो बौद्धिक व वैचारिक

अनुक्रमणिका

बाबतीत स्वयंपूर्ण व प्रगत न होता दुबळाच राहतो. तसेच लोकशाहीतील स्वातंत्र्यामुळे नागरिक हा आपले प्रश्न कसे सोडवावेत हे जाणणारा, स्वतःच्या कर्तृत्वावर विश्वास असणारा व कर्तृत्ववान असा बनू शकतो. हुकूमशाहीमध्ये नागरिकास बहुतांश वरच्या आदेशाप्रमाणे सांगकाम्याचे काम करावे लागते. त्यामुळे हुकुमशाहीत नागरिकाच्या बुद्धीस व कर्तृत्वास जरूर तो वाव मिळत नाही. वरील दोन्ही गोष्टींचा परिणाम म्हणून, लोकशाहीची कूस ही जात्याच संपन्न बनते. परिणामी लोकशाहीस बुद्धिमान, कर्तृत्ववान व लोकहितकारी अशा असंख्य लोकप्रतिनिधींची, कार्यकर्त्यांची, व नागरिकांची परंपरा लाभते. साहजिकच त्यांतून लोकशाहीस हुषार, कर्तबगार व लोकहितकारी राज्यकर्त्यांची व कारभाऱ्यांचीही परंपरा लाभते. या उलट, हुकूमशाहा कौटिल्याने व दांडगाईने सत्तेवर येत असल्यामुळे, तो कौटिल्यामध्ये व दांडगाईमध्ये प्रवीण असू शकतो. परंतु तो राज्यशासनासाठी अवश्य असणाऱ्या बौद्धिक व कर्तृत्वाच्या गुणांनी तो युक्त असतोच असे म्हणता येत नाही. याशिवाय हुकूमशाहीत हुकूमशहा आयुष्याच्या शेवटच्या टप्प्यापर्यन्त अगर उत्पातापर्यंत अधिकारावर राहात असल्यामुळे, तेथे इतरांच्या कर्तबगारीस वाव मिळत नाही. लोकशाहीमध्ये मात्र वेळोवेळी होणाऱ्या निवडणुकांमुळे नवे नवे कर्तबगार लोकप्रतिनिधी विधिमंडळावर व अधिकारावर येतात.

### ८. लोकशाहीतील मुक्त स्वातंत्र्य व नागरिक हक्क आणि हुकूमशाहीतील बंदिशाळा

लोकशाहीतील व हुकूमशाहीतील गुणावगुणांची वरीलप्रमाणे छाननी होऊन सुद्धा आणखी काही महत्वाचे असे गुण लोकशाहीच्या पारड्यात उरतात. सर्वात महत्वाचा गुण म्हणजे लोकशाहीत आपले राज्यकर्ते निवडण्याचा सर्वश्रेष्ठ अधिकार सामान्य नागरिकास असतो व कांही ठिकाणी त्यांचे प्रतिनिधित्व रद्द करण्याचाही त्यास हक्क असतो. भारतातील नागरिकांनी आतापर्यंत पाच वेळा हा अधिकार उपभोगला आहे. परंतु असंख्य भारतीय नागरिकांना याचे अद्याप महत्व समजलेले व पटलेले नाही. ज्या देशांतील नागरिकांजवळ हा अधिकार नाही, अशा लोकांनाच या हक्काचा अर्थ व महत्व समजू शकणार आहे. हा अधिकार प्रत्यक्ष उपभोगणाऱ्यांना तितके त्याचे महत्व समजणार नाही. या हक्काइतकेच लोकशाहीतील नागरिकांचे मूलभूत हक्क महत्वाचे आहेत. काय बोलावे, काय लिहावे, कोणत्या संघटनेत असावे, व देशातल्या कोणत्याही भागात मुक्तपणे जावे या गोष्टींचे संपूर्ण स्वातंत्र्य लोकशाहीने सर्व नागरिकांना दिलेले असते. हुकूमशाहीत नागरिकांना यांपैकी

अनुक्रमणिका

काहीही मिळत नाही. रशियासारख्या कम्युनिस्ट राष्ट्रांतील आर्थिक प्रगति गृहीत धरूनसुद्धा, तेथील नागरिक सर्वथैव गुलाम असतो, असे दिसून येते. समाजरूपी यंत्रामध्ये तो एक निर्जीव नटबोल्ट असतो. कोंदट हवेत अगर अनारोग्यकारक जागेत जगणाऱ्या माणसाप्रमाणेच हुकूमशाहीतील नागरिकाची अवस्था असते. या उलट लोकशाहीतील जीवन हे मोकळ्या व आरोग्यमय वातावरणातील जीवन असते. हुकूमशाहीत नागरिकांवर किती व कसकशी बंदी लावली जाते त्या पैकीची काही उदाहरणे अशी आहेत :—

रशियातील श्रेष्ठ साहित्यिक पास्टर नाईक यांना नोबेल पारितोषिक घेण्यास बंदी केली गेली. रशियातील व इतर अनेक कम्युनिस्ट देशांमधील साहित्यिकांचा अनेक प्रकारे छळ करण्यात आला व अनेकांना देश सोडून जावे लागले आहे. रशियातील २५ कोटी लोकसंख्येपैकी एक कोटीहून अधिक लोक कॉन्सेन्ट्रेशन कँपमध्ये आहेत. जो कोणी राज्यकर्त्याहून वेगळ्या विचाराचा आहे अगर ज्याच्याबद्दल राज्यकर्त्यांना संशय असेल अशा नागरिकास या बंदीशाळेत डांबले जाते. तेथे त्यांचा छळ केला जातो, त्यांचा ब्रेन वॉश केला जातो व काहींचा घातही केला जातो. चीनमधील शेतीच्या कॉम्यूनवर चिनी शेतकरी दिवसरात्र राबत असतात परंतु पति एका कॉम्यूनवर व पत्नी दुसऱ्या कॉम्यूनवर अशी विभागणी व फारकत तेथे केली जाते आणि त्यांना कौटुंबिक जीवनापासून वंचित केले जाते. प्रत्येक कम्युनिस्ट राजवटीत साधारणपणे फक्त दोन तीनच वृत्तपत्रे असतात; त्यापैकी एक दोन सरकारने चालवलेली व एक दोन कम्युनिस्ट पक्षाने चालवलेली असतात. अशा वृत्तपत्रांमधून कम्युनिस्ट पक्षाकडून व सरकारकडून जी काही बातमी दिली जाते तीच केवळ नागरिकांना मिळू शकते. शिवाय अन्य वृत्तपत्रे तेथे नसल्यामुळे खोट्या बातम्यासुद्धा त्यातून द्यायला वाव असतो. साहजीकच या वृत्तपत्रांच्या वाचकांना वैचारिक मार्गदर्शन म्हणजे कम्युनिस्ट पत्राच्या व सरकारच्या दृष्टिकोनानुसार मांडल्या जाणाऱ्या एकतर्फी अशा टिपण्या असतात. आणखी एक तेथील मोठी दुरवस्था म्हणजे 'कामगारांची हुकूमशाही' ( प्रोलेटॅरियट् डिक्टेटरशिप ) म्हणवल्या जाणाऱ्या कम्युनिस्ट राजवटीत कामगार संघांना आपल्या मागण्यासाठी लढा देण्याचा व संप करण्याचा मुळीच हक्क नसतो.

## ९. लोकशाही ही समतेची व मानवतावादी जीवनपद्धती

लोकशाही ही केवळ एक राज्यपद्धति नाही. स्वातंत्र्य, समता व बंधुभाव ही थोर तत्वे लोकशाहीची तत्वे म्हणून फ्रेंच राज्यक्रांतीने पुरस्का-

रली आहेत. मानवांमध्ये समता व बंधुभाव या तत्वांचा पुरस्कार करणारी आणि त्यासाठी प्रत्यक्ष व्यवहारात सर्व थरातील नागरिकांना मुक्त स्वातंत्र्य व समानसंधी देण्याचा अट्टाहासाने प्रयत्न करणारी लोकशाही ही बहुमोल अशी मानवतावादी जीवनपद्धति आहे. बहुसंख्यांचे अल्पसंख्यांवर अधिराज्य असे खरे लोकशाहीचे स्वरूप नसते. अल्पसंख्यांना विश्वासात घेऊन व त्यांच्या हिताचे रक्षण करून बहुसंख्यांनी शासन चालवणे, असे खरे लोकशाही राजवटीचे स्वरूप आहे. कदाचित मी चूक असेन व समोरची व्यक्ति बरोबर असेल, या भूमिकेतून समोरच्या व्यक्तीस आपली भूमिका व मत मांडण्यास पूर्ण मोकळीक देणे हे लोकशाहीतील एक मुख्य सूत्र आहे, त्यासाठी परमत–सहिष्णुता लोकशाही जीवनात आचरावी लागते. सर्व व्यक्ति समान आहेत. माझ्या प्रमाणेच समोरची व्यक्ती व्यक्तिमत्त्वाची व महत्वाची आहे हे तत्व खऱ्या लोकशाहीत जगायचे असते. त्यामुळे तेथे असमानतेचा दृष्टिकोन ठेवायचा नसतो. आपल्यापेक्षा कमी वयाच्या, आपल्यापेक्षा कमी आर्थिक परिस्थितीच्या व आपल्यापेक्षा कमी श्रेणीतील नोकरीच्या माणसांशी देखील लोकशाहीत समत्वाच्या दृष्टिकोनातून वागायचे असते. शेजारच्या व्यक्तीचे अनहित घडल्यास आपले हित टिकून राहू शकत नाही, ही तात्विक व व्यवहारी बाजू लक्षात घेऊन प्रत्येकाने शेजारच्या व समोरच्या व्यक्तीच्या हिताची जपणूक लोकशाहीत करायची असते. अशारीतीने लोकशाही ही उच्च नैतिक मूल्यावर आधारलेली वास्तव स्वरुपाची समाजव्यवस्था व जीवनपद्धति आहे. विशिष्ट लोकशाहीसमाजात काही दोष असतील तर ते व्यक्तींच्या आचरणातील दोष होत व व्यक्तींनी ते प्रयत्नपूर्वक काढून टाकायचे असतात. आपण नव्याने ही पद्धति स्वीकारली असल्यामुळे आपल्या लोकशाही आचरणात अनेक दोष दिसून येतात. हे दोष टाळण्यासाठी लोकशाही टाकून हुकूमशाही स्वीकारणे योग्य होणार नाही. कारण एकदा हुकूमशाहीच्या अंकित झालेला समाज कडक हुकूमशाही नियंत्रणामुळे लोकशाही जीवनाकडे परत येणे बहुतांश अशक्य असते.

## १०. आचारसंहिता

वरीलप्रमाणे लोकशाही जीवनाची गरज व उपयुक्तता लक्षात घेता, लोकशाहीत प्रत्येक व्यक्तीने व संस्थेने खालीलप्रमाणे गोष्टी कटाक्षाने आचरणे जरूर आहे :

(१) प्रत्येक नागरिकाने कट्टर लोकशाही विचाराचे झाले पाहिजे व लोकशाहीतील सूत्रे सतत आचरण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अर्थात मुख्यतः हिंसक व लोकशाहीविरोधी कार्यात भाग घेऊ नये. (२) लोकशाहीचे फायदे, गुण

लोकशाही जीवनाची व लोकशाही आचरणाची गरज दुसऱ्यास पटवून दिली पाहिजे. (३) विरोधी पक्षांनी हिंसक, अराजक निर्माण करणारी व लोकशाहीस मारक अशी निदर्शने व कृत्ये करू नयेत. (४) सरकारने म्हणजे अधिकारारूढ पक्षाने स्वतःकडे अधिकाधिक अधिकार घेण्याची, घटनाविरोधी व लोकशाही विरोधी वागणूक करण्याची व नागरिक स्वातंत्र्याची गळचेपी करण्याची कामे करू नयेत, आणि न्यायपालिकेस योग्य बरोबरीचा दर्जा राहील अशी व्यवस्था ठेवावी. (५) तसेंच सरकारने सनदशीर निदर्शनांची व विरोधी विचारांची लवकरांत लवकर दखल घ्यावी. कोणत्याही प्रश्नास हिंसक वळण लागेपर्यंत अगर परिस्थिती बिघडेपर्यंत त्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करू नये. प्रत्येक प्रश्न न्यायाच्या, लोकशाहीच्या व मानवतेच्या दृष्टिकोनातून सोडवावा. (६) संसदेत, विधिमंडळात, विद्यापीठांत, नगरपालिकांत अगर जिल्हा परिषदांत दंगली करू नयेत. (७) कामगार संघटनांनी दंगली करून अगर बेसनदशीर कृत्ये करून आपल्या मागण्या साध्य करण्याचे धोरण ठेवू नये. (८) सरकारमध्ये व अन्य संस्थांमध्ये अधिकारावर असलेल्या पक्षांनी व गटांनी भ्रष्टाचार न करता स्वच्छ व शुद्ध कारभार केला पाहिजे. कर्तव्याची जाणीव ठेवून जास्तीत जास्त सेवा चालकांनी, अधिकाऱ्यांनी व सेवकांनी दिली पाहिजे. (९) फक्त लोकशाहीवादी व चारित्र्यसंपन्न उमेदवारांना निवडणुकीस उभे करावे व मतदारांनी अशानांच मतदान करावे. जातीवादी, कम्युनिस्ट, फॅसिस्ट अगर अन्य हुकूमशाहीवादी विचारसरणीच्या किंवा चांगले चारित्र्य नसलेल्या व्यक्तींना निवडणुकीस उभे करू नये व मतदान करू नये. (१०) सत्तारूढ व अन्य राजकीय पक्षांमध्ये, कामगार संघटनामध्ये, सहकारी संस्थामध्ये व अन्य संस्थांमध्ये निर्णय घेण्याच्या क्रियेत सामान्य सभासदांना जास्तीतजास्त अधिकार व वाव देण्याची तरतूद ठेवावी.

## ११. लोकशाही संपुष्टात येऊन हुकूमशाहीचा उदय

लोकशाही संपुष्टात येऊन हुकूमशाहीचा उदय झाल्यास राजकीय पक्ष व त्यांचे नेते, तसेच कामगार संघटना, सहकारी संस्था व वैचारिक संस्था यांचे अस्तित्वही नष्ट होणार आहे. हा गंभीर धोका नीट लक्षात घेऊन सर्व राजकीय पक्षांनी- लोकशाहीवादी विचारसरणी नसलेल्यांनी सुद्धा– कामगार संघटनांनी, सहकारी संस्थांनी व अन्य संस्थांनी वरील आचारसंहिता पाळण्याचे आश्वासन नागरिकांना देणे जरूर आहे व ती काटेकोरपणे पाळण्याचा निश्चय करणे जरूर आहे. भारतातील लोकशाहीची बाल्यावस्था लक्षांत घेता भारतात याची नितांत गरज आहे.



## पत्रव्यवहार —

श्री. संपादक ' नवभारत ' यासी –

श्री. दिलीप दीक्षित यानी माझ्या " मार्क्सप्रणीत नवा धर्म " या लेखातील निर्देश केलेले एक अनवधान अवलोकनात आले. ( मे १९७५ ) कँटने Practical Reason या ग्रंथाच्या भागात मांडलेल्या नीति व ईश्वर या संकल्पना-अपरिहार्यतेच्या संदर्भात फिश्टेने केवळ तर्कशास्त्राच्या पातळीवर Ego, non. Ego व Absolute असे त्रिदल Dialectic ( प्रश्नोत्तर सत्यान्वेषण ) प्रथमच उभारले हे खरे आहे. फिश्टे हा कँटचा समकालीन व हेगेलला ८ वर्षांनी आणि मार्क्सला १८ वर्षांनी ज्येष्ठ होता. तरी बर्ट्रंड रसेल यांच्या History of Western Philosophy या ग्रंथात हेगेल व मार्क्स याना खास प्रकरणे अर्पण केलेली असून त्यात हेगेलने प्रतिपादलेली त्रिविध हप्त्यानी घडणारी इतिहासाची वाटचाल फिश्टेने सुचविली असेल असा उल्लेख नाही. फिश्टेला खास असे प्रकरण नाही तरी पाच सात ठिकाणी त्याची तत्वज्ञानाच्या पुढील मार्गक्रमणावर पडलेली छाया अजमावताना देखील त्याच्या Dialectic तर्कपद्धतीच्या जनकत्वाचा उल्लेख नाही. हेगेलने राष्ट्रावताराच्या संदर्भात व मार्क्सने सरंजामी, भांडवली व श्रमजीवी अशा वर्ग समाजजीवनाच्या संदर्भात Dialectic जखडून टाकल्याचा तो परिणाम असेल. माझा तत्वज्ञानाचा व विशेषेकरून तर्कशास्त्राचा अभ्यास यथातथाच असल्याकारणाने अधिक चर्चा करणे योग्य होणार नाही.

× × ×

प्रा. माने यांचा " पुरोहित वर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास " या माझ्या ग्रंथावरील लेख ( मे १९७५ ) विचारप्रवर्तक खास आहे. तथापि श्रममूल मौलिकता, गैरवाजवी त्यागशून्य नफा व यांच्या संदर्भात घडणारी तथा-कथित श्रमजीवी वर्गाची नागवणूक हे कार्ल मार्क्सचे बिनबुडाचे, तर्कदुष्ट प्रमेय मला ग्राह्य वाटते अशी प्रा. माने यांची समजूत झाली की काय कोण जाणे. ते प्रमेय ग्राह्य अग्राह्य कसेही असले तरी इ. स. १८५० पर्यंत भांडवली उत्पादन व श्रमजीवी वर्ग यांचा थोडादेखील प्रादुर्भाव भारतात झाला नसल्याकारणाने इ. स. पू २५०० ते इ. स. १८५० पर्यंतच्या भारती समाजजीवनाशी तसल्या नागवणुकी तंत्रणायंत्रणेचा प्रश्नच उद्भवत नाही. पृ. ७५ व पृ. १८३ यावर त्या त्या प्रकरणांच्या प्रारंभीच स्पष्ट केल्याप्रमाणे आर्थिक शोषणाच्या अनेक यंत्रणा व प्रकार इतिहासात दिसतात. महाभारतात एके ठिकाणी उल्लेखिल्याप्रमाणे " मानुषो मानुषानेव








दासभावेन भुंजते " हे कालपरवापर्यंत तरी खरे दिसते. कार्ल मार्क्सचे विचारधन त्याच्या मौलिकतेच्या प्रमेयापलीकडे बरेच विस्तृत आहे, सूचक आहे यात संशय नाही. धर्म हा नुसती अफूची गोळी असते की डोकी फिरवणारा मादक पदार्थ असतो हे संशयित असले तरी शोषणाचे ते एक तंत्र सहज होऊ शकते. मार्क्सच्या ऐतिहासिक अनन्यगतिकत्वाच्या प्रमेयाबद्दल माझ्या पुढील वाक्या-कडे दुर्लक्ष होऊ नये " शोषणाची तंत्रे कालमानाप्रमाणे बदलत असतात. व माणसांच्या क्रिया–प्रतिक्रिया तंत्राबरहुकूम ठरत असतात. . . . . याचा अर्थ असा मात्र नाही की मानवाचा इतिहास असाच पुढेही चालू राहील. लोकशाही व ज्ञानप्रसार यांच्या प्रभावामुळे भविष्यकाळ भूतकाळाचा काय-मचा कैदी राहणे शक्य नाही ( पृ. १८३ ) . . . माणसांच्या जीवनमूल्यांची हेतुपुरस्सर व वर्गस्वार्थनिरपेक्ष अशी पुनर्रचना शक्य झाली आहे. भौतिक प्रगतीमुळे नवीन जीवनमूल्ये कार्यवाहीत आणण्यास अननुभूतपूर्व अशी प्रभावी तंत्रणा व यंत्रणा ही माणसास उपलब्ध होत आहे. मानवी इच्छास्वातंत्र्याचे क्षितिज झपाट्याने रुंदावत आहे. ( पृ. १० ) ह्या स्पष्टीकरणाची संधि दिल्याबद्दल मी प्राध्यापक द्वयांचा आभारी आहे.

–सुमंत मुरंजन

## गागाभट्ट एक टिपण

श्री. संपादक नवभारत यास स. न. वि. वि.

ऑगस्टच्या नवभारतात गागाभट्ट एक टिपण वाचण्यात आले. सध्या मी दौऱ्यावर आहे. त्यामुळे हाताशी सन्दर्भग्रन्थ नाही. परंतु माझ्या व्याख्यानांची टिपणें हाताशी आहेत. त्या आधारे हे पत्र पाठवीत आहे.

गागाभट्टाचे पणजोबा माधवभट्ट हे वाराणशीला येऊन स्थायिक झाले, असे नसून गागाभट्टांचे पणजोबा नारायणभट्ट यांचे वडील रामेश्वरभट्ट हे शके १४४३ त काशीस गेले आणि तेथेच स्थायिक झाले. तसेच गागांच्या आजोबांचे नाव रामेश्वरभट्ट नसून रामकृष्णभट्ट होय. नारायणभट्टांचा जन्म पैठणास झाला असून त्यांचे वडील काशीस स्थायिक झाले तेव्हा नारायणभट्ट हे ८-९ वर्षांचे होते. या नारायणभट्टांनीच उध्वस्त काशीविश्वनाथाची शके १५०२ मध्ये पुनर्प्रतिष्ठापना केली होती. हेच मंदिर पुढे गागांच्या डोळ्यासमोर शिवराज्याभिषेकापूर्वी शके १५९०–९१ त औरंगजेबाने विध्वंसिले.

अनुक्रमणिका

मूळ पैठणनिवासी या भट्टकुलाची परंपरा अशी आहे :– नागपाश–चांगदेव–गोविन्द–रामेश्वर–नारायण–रामकृष्ण–दिनकर–गागा

शिवद्युमणिदीपिका ग्रन्थाचा लेखनकाल (शक्य असल्यास) आणि त्यातील दिनकरभट्ट लिखित पूर्वभागातील शिवाजीच्या उल्लेखाची ओळ उद्धृत केल्यास याविषयी विचार करता येईल.

स्व. बाळशास्त्री हरदासांनी गागाभट्टांच्या कुलाची माहिती त्यांच्या शिवचरित्राच्या ग्रन्थात दिली आहे. त्यात शिवद्युमणिदीपिका या ग्रन्थाचा उल्लेख नसावा असे वाटते. बाळशास्त्रींच्या माहितीनुसार गागाभट्टांनी आपल्या वडिलांचा दिनकरोद्योत हा अर्धवट राहिलेला ग्रन्थ पूर्ण केला.

चतुर्थाश्रमभंगदोष स्वीकारून गागाभट्टांनी शिवाजीच्या अनुरोधामुळे राज्याभिषेकाचे आध्वर्यव केले हा मुद्दा निश्चितच अद्यापर्यंत तरी माझ्या वाचनात नाही, अलवार संग्रहातल्या या उल्लेखाचे परीक्षण व्हावयास हवे. कारण श्री. बेन्द्रे यांच्या संभाजी–चरित्रात तर असा उल्लेख आहे की परिस्थितीच्या भीषणतेमुळे गागाभट्टांनी संभाजीचे आमंत्रण स्वीकारले नाही आणि त्यांनी 'समयनय' नावाचा ग्रन्थ पाठविला आणि त्यानुरोधाने संभाजीचा राज्याभिषेक झाला. चतुर्थाश्रमभंगदोषाचा उल्लेख स्व. बाळशास्त्री आणि श्री. बेन्द्रे या दोघानीही केलेला नाही.

– नरसिंह जोशी

---

चुकीची दुरुस्ती–

'बापू साने– (पेशवाईच्या अखेरच्या दिवसातील एक उपद्व्यापी व त्याची अखेर)' हा प्रा. सदाशीव आठवले यांचा 'नवभारता'च्या मे १९७५. च्या अंकात प्रसिद्ध झालेला लेख अनवधानाने 'पत्रव्यवहार' ह्या सदरात छापण्यात आला आहे. हा स्वतंत्र लेख आहे व पत्र नाही हे वाचकांच्या ध्यानी आले असेलच. प्रा. आठवले यांचा लेख पत्र म्हणून प्रसिद्ध झाल्याबद्दल आम्ही दिलगीर आहोत.

का. संपादक, नवभारत.

अनुक्रमणिका

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

## म रा ठी

| | | |
|---|---|---|
| (१) | वैदिक संस्कृतीचा विकास ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ३०·०० |
| (२) | भावार्थ रामायण ( श्री एकनाथ महाराज कृत ) बालकांड | १२·०० |
| (३) | इतिहासाचे तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | १०·०० |
| (४) | क्रोचेचे सौंदर्यशास्त्र ( अनु. डॉ. रा. भा. पाटणकर ) ... | १०·०० |
| (५) | सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती ( प्र. रा. देशमुख ) | १०·०० |
| (६) | पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास ( डॉ. सुमंत मुरंजन ) ... ... ... | ८·०० |
| (७) | चार्वाक–इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ६·०० |
| (८) | मानवाचा आदर्श ... ... ... ... | ६·०० |
| (९) | नवमानवतावाद ... ... ... ... | ५·०० |
| (१०) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... ... | ५·०० |
| (११) | लोकशाहीचे धोके ( श्री. पन्नालाल सुराणा ) ... ... | ४·०० |
| (१२) | भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) ... | ४·०० |
| (१३) | हिंदी साहित्यविचार ( प्रा. पॅरेलाल गोहेल ) ... .... | ३·०० |
| (१४) | महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... ... | २·०० |
| (१५) | वायुस्तुति ( माध्व ) समश्लोकी व तात्पर्यार्थासहित ... | १·०० |
| (१६) | न्यायसार – आचार्य भासर्वज्ञप्रणीत मराठी भाषांतर व अर्थबोधक टीपांसहित .... ... | ५·०० |
| (१७) | श्री. यशवंतराव चव्हाण– अभिनंदनग्रंथ ... ... | २०·०० |

मिळण्याचे ठिकाण– **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( जि. सातारा )**

अनुक्रमणिका